






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१३

एप्रिल-मे-जून २००५






## शताब्दी-शुभारंभ सोहळा

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३१३
एप्रिल-मे-जून २००५



संपादक
**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**





**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी (०२०) २४४७५९६३

## अनुक्रमणिका





---


**मुद्रक-प्रकाशक** : रवीन्द्र भट, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

**मुखपृष्ठ छायाचित्र** : संजय भालेराव

**मुद्रणस्थळ** : स्मिता प्रिंटर्स, १०१९ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.

**अक्षरजुळणी** : एच. एम. टाइपसेटर्स, ११२०, सदाशिव पेठ, निंबाळकर तालीम चौक, पुणे ४११०३०.

**किंमत १५/- रुपये**

**प्रकाशन दिनांक** : जून २००५


(या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमी सहमत असेलच, असे नांही.)

## संपादकीय

**महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे शताब्दी शुभारंभ :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेने २७ मे २००५ रोजी शंभराव्या वर्षात पदार्पण केले आहे. त्याचा आनंदोत्सव भारती विद्यापीठ, पुणेच्या सहकार्याने त्या संस्थेच्या मोरे विद्यालयात साजरा झाला. हा शतसांवत्सरिक उत्सवाचा शुभारंभ आहे. वर्षभर पुण्याच्या परिषदेने आणि तिच्या शाखांनी आपापल्या परीने हा साहित्योत्सव साजरा करायचा आहे. या उत्सवाचे उद्घाटन महाराष्ट्राचे सहकार, पुनर्वसन आणि मदतकार्य मंत्री मा. ना. डॉ. पतंगराव कदम यांच्या हस्ते झाले. श्री. राजेंद्र बनहट्टी (अध्यक्ष म. सा. प. पुणे) यांच्या अध्यक्षतेखाली आणि उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळाचे अध्यक्ष श्री. उल्हासदादा पवार, साहित्य संमेलनाध्यक्ष प्रा. रा. ग. जाधव, साहित्यिक आमदार श्री. यशवंतराव गडाख-पाटील यांच्या विशेष उपस्थितीत साजरा झाला. या प्रसंगी ज्येष्ठ लेखक डॉ. वि. रा. करंदीकर यांना

म. सा. प. पारितोषिक व 'डॉ. भीमराव कुलकर्णी साहित्यिक कार्यकर्ता पुरस्कार' सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. सुधीर रसाळ यांना, तर म. सा. प. चे विशेष ग्रंथकार पुरस्कार श्री. विश्वास पाटील (कादंबरी), श्री. उपेंद्र कुलकर्णी (श्रीविद्या प्रकाशन)– उत्कृष्ट प्रकाशन, डॉ. द. भि. कुलकर्णी (कादंबरी-समीक्षा), डॉ. अश्विनी धोंगडे (ललितेतर वैचारिक), डॉ. क. उ. संघवी (कृषिविषयक लेखन), डॉ. वि. मा. बाचल (आत्मचरित्र), डॉ. सुजाता देशमुख (अनुवाद), श्री. शंकर अभ्यंकर (संतसाहित्य विवेचन), श्री. दत्ता हलसगीकर (काव्य), श्री. गंगाधर महांबरे (काव्य), डॉ. प्रभा अत्रे (संगीत), श्री. पंडित विद्यासागर (विज्ञानविषयक लेखन), डॉ. निर्मलकुमार फडकुले (संशोधनासाठीचे मृत्युंजय पारितोषिक), श्री. स. मा. गर्गे (संदर्भ-अनुवाद व आंतरभारती कार्य) आणि डॉ. भीमाशंकर देशपांडे (महाराष्ट्र–कर्नाटक संबंध) या सर्वांना प्राप्त झाले. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन!

२७ मे २००५ च्या रात्री ९ ते १२ महाराष्ट्रातील विविध प्रथितयश कवींचे काव्यसंमेलन झाले. सुमारे चाळीस कवींनी काव्यरजनी जागविली. दि. २८ मे २००५ रोजी 'स्वातंत्र्यानंतरच्या काळातील मराठी साहित्याच्या बदलत्या संदर्भा'विषयी डॉ. सुधीर रसाळ यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. द. ता. भोसले (कथात्म साहित्य), प्रा. निशिकांत ठकार (कविता), श्री. श्रीनिवास भणगे (नाटक), डॉ. बाळ फोंडके (विज्ञानकथा), डॉ. अरविंद संगमनेरकर (आरोग्य) या वक्त्यांनी विचारमंथन केले. दुपारी २.३० ते ४.३० या वेळात



अनुक्रमणिका

प्रा. द. मा. मिरासदार, (अध्यक्ष) श्रीमती गिरिजा कीर, श्री वामन होवाळ, श्री. अप्पासाहेब खोत आणि सुरेश शिंगटे यांनी कथाकथन केले.

सायं ५ ते ८ शाहीर विठ्ठल उमप व सहकाऱ्यांनी महाराष्ट्र लोककलेचे सादरीकरण केले. या कार्यक्रमांनी म. सा. प. पुणे शताब्दी उत्सवास प्रारंभ झाला.

**अभिवादन, अभिनंदन आणि शुभेच्छा!**

मराठी वाङ्मयाच्या इतिहासातील एक प्रसन्न प्रकरण **प्रा. अनंत काणेकर** आणि मराठी ग्रंथ सूचिकार **श्री. शंकर गणेश दाते** यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांना अभिवादन करणारे विशेष लेख श्री. रवींद्र पिंगे आणि श्री. म. श्री. दीक्षित यांनी या अंकासाठी लिहिले आहेत. या थोर साहित्यिकांना अभिवादन!

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथील कार्यकारी मंडळावरील सोलापूरचे प्रतिनिधी, सोलापूर शाखेचे कार्याध्यक्ष– प्रसिद्ध कवी लक्ष्मीनारायण बोल्ली यांना हैद्राबादच्या पोट्टी श्रीरामलू विद्यापीठाने डी. लिट्. ही सन्माननीय पदवी त्यांच्या तेलुगू, मराठी अनुवाद कार्यासाठी– बहाल केली. श्री. बोल्ली यांनी तीन काव्यसंग्रह, तसेच गीत-मार्कण्डेय, अभंग-कलश (तेलुगू संतकवी बेमना यांच्या काव्यवचनांचा अनुवाद), पंचपदी (काव्यानुवाद), एका पंडिताचे मृत्युपत्र (अनुवादित कादंबरी), रात्र एका होडीतली (कथा-अनुवाद) इ. ग्रंथांची निर्मिती केली. परिषदेतर्फे श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली यांचे अभिनंदन!

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोनई (नेवासा), जि. अहमदनगर शाखेचे अध्यक्ष साहित्यिक आमदार श्री. यशवंतराव गडाख-पाटील यांच्या 'अर्धविराम' या आत्मचरित्राचा पुणे विद्यापीठाच्या बी. ए. (मराठी) च्या अभ्यासक्रमात समावेश करण्यात आला. तसेच महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे चा कै. नरूभाऊ लिमये, आर्यभूषण पुरस्कार प्राप्त झाला, याबद्दल त्यांचे अभिनंदन! म.सा.प., पुणे चे उपाध्यक्ष प्रसिद्ध साहित्यिक आणि पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख **डॉ. नागनाथ कोत्तापल्ले** यांची डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या कुलगुरू पदावर नेमणूक झाली. त्यानिमित्त म.सा.प., पुणे च्या वतीने प्रसिद्ध शास्त्रज्ञ **डॉ. गोवारीकर** यांच्या हस्ते डॉ. कोत्तापल्ले यांचा हृद्य सत्कार करण्यात आला (३ जून २००५). डॉ. कोत्तापल्ले यांच्या भावी कार्यास शुभेच्छा!

याशिवाय म.सा.प., पुणे चे कार्यकारी मंडळावरील सदस्य डॉ. भगवान ठाकूर यांची डॉ. आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या, मराठी विभाग प्रमुखपदी नेमणूक झाली. त्यांचे अभिनंदन, आणि सोलापूर शाखेचे कार्यवाह, म.सा.प., पुणे चे माजी कार्यकारी मंडळ सदस्य ॲड. जे. जे. कुलकर्णी हे सोलापुरातील एक चैतन्यशील व्यक्तिमत्त्व. यांनी ६१ व्या वर्षात पदार्पण केले. त्याबद्दल त्यांचे परिषदेतर्फे अभीष्ट चिंतन!

**पन्नास वर्षांचा लेखनप्रवास– श्री. रत्नाकर मतकरी**

मराठी साहित्यातील गूढकथा लेखक, विज्ञान-कथाकार, नाटककार, बालरंगभूमीला नवचैतन्य देणारे रंगकर्मी, स्त्री-मनाच्या वेदनांवर आधारित 'दहाजणी' कथासंग्रहाचे लेखक,

मराठी साहित्यास सुमारे ९० ग्रंथांचे योगदान करणारे साहित्यिक श्री. रत्नाकर मतकरी यांच्या लेखनकार्यास पन्नास वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त भरतनाट्य संशोधन मंडळातर्फे त्यांचा आणि त्यांच्या पत्नी सौ. प्रतिमा मतकरी यांचा यथोचित सत्कार झाला. श्री. मतकरी यांच्या पन्नास वर्षांच्या लेखनप्रवासाबद्दल म.सां.प. तर्फे हार्दिक अभिनंदन!

**'फोटो-बायोग्राफी' (छायाचित्र-चरित्र)**

चरित्र वा आत्मचरित्र लिहिण्यात खरा अडथळा असतो तो प्रामाणिकपणाचा! काही वेळा खरे सांगणे हाही गुन्हा होऊ शकतो. काही वेळा अर्थाचे अनर्थही होतात. मग विविध दृश्यांच्या आधारे जीवनपट लोकांसमोर मांडणे आणि त्यावर स्वत: भाष्य न करता ते लोकांवरच सोपविणे हा सुवर्णमध्य साधणारा 'चित्ररूप चरित्र' (फोटो-बायोग्राफी) हा प्रकार नुकताच साहित्यात अवतरला आहे. ज्यांच्या कुंचल्याने अनेक राजकीय चळवळींना चालना दिली, ज्यांच्या वाणीने महाराष्ट्राला आकर्षित केले आणि वादळेही निर्माण झाली असे झंझावाती व्यक्तिमत्त्व, श्री. बाळासाहेब ठाकरे यांची 'फोटो-बायोग्राफी' प्रेक्षणीय आणि चिंतनीय आहे. या वादळाला छायाचित्रांत बद्ध करणारे श्री. राज ठाकरे यांचे अभिनंदन!

**गीतरामायणाच्या पन्नाशीस अभिवादन!**

'गदिमां'च्या लेखणीचा काव्यसंस्कार आणि सुधीर फडके यांचा स्वरसंस्कार लाभलेली रामकथा– गीतरामायणाच्या रूपाने मराठी माणसाच्या मनात घर करून बसली आहे. औंधच्या पंतप्रतिनिधींच्या 'चित्ररामायणाचा' घाट समोर ठेवून गीतरामायणाला गदिमांनी आकार दिला आहे. रामचरित्रातील नेमके प्रसंग निवडून पंतप्रतिनिधींनी अत्यंत बोलकी चित्रे रंगविली आणि मधून-मधून नेमक्या शब्द-निवेदनांनी ती एकमेकांत गुंफत रामायण चित्रबद्ध केले आहे. त्या चित्रांच्या जागी 'गदिमां'च्या चित्रमय शब्दांची काव्यरचना साकारली. निवेदनांनी ती एकमेकांत गुंफली. आमचे शिक्षक प्रसिद्ध गायक श्री राम फाटक यांनी माझ्याकडून चित्ररामायणाचे पुस्तक यासाठी नेले होते. त्याची संगती आज लागते. (डॉ. बालाजी तांबे यांच्या 'सकाळ' मधील लेखातील तुलना वाचून ही स्मृती जागी झाली.) गीतरामायणाच्या अमर कलाकृतीस अभिवादन!

आजच्या युवा पिढीने नव्या तंत्रज्ञानाच्या आधारे अत्यंत उत्कटतेने गीतरामायणाचे सादरीकरण केले, त्याबद्दल त्यांचे आणि संयोजक 'सकाळ'चे अभिनंदन!

**नाट्यगौरव पुरस्कार**

या वर्षाचा नाट्यगौरव पुरस्कार नाटककार, नट, दिग्दर्शक प्रा. मधुकर तोरडमल यांना मिळाला हे योग्यच झाले. अहमदनगर कॉलेजच्या थिएटर ग्रुपच्या माध्यमातून प्रा. तोरडमल यांनी नाटके लिहिली आणि सादर केली. स्वच्छ वाणी, देखणे, रुबाबदार व्यक्तिमत्त्व लाभलेल्या प्रा. तोरडमलांच्या नाट्यप्रतिभेस प्रकाशात आणले ते राज्यनाट्यस्पर्धेने! 'काळे बेट-लाल बत्ती', 'सैनिक नावाचा माणूस', 'भोवरा', 'आश्चर्य नं. १०' या नाटकांनी प्रारंभ

करून पुढे... 'तरुण तुर्क म्हातारे अर्क' पर्यंतच्या नाट्यप्रवासात त्यांनी रसिकांची मने जिंकली. श्रीमती आशालता वाबगावकर यांना उपजत लाभलेली गानकला आणि रंगभूमीला शोभणारे व्यक्तिमत्त्व– यांच्या सुरेख संगमाचे रूप श्रीमती वाबगावकर– यांनाही नाट्यगौरव सन्मान प्राप्त झाला. या दोघांचे परिषदेतर्फे अभिनंदन!

**प्रा. लक्ष्मण हर्दवाणी**

अहमदनगर महाविद्यालयातील हिंदी विषयाचे प्राध्यापक लक्ष्मण हर्दवाणी यांनी मराठी संतवाङ्मयाचा सिंधी भाषेत अनुवाद करून मराठी व सिंधी भाषेची बहुमोल सेवा केली आहे. ज्ञानेश्वरी, तुकारामांचे अभंग, दासबोध, मनाचे श्लोक यांचा सिंधीत अनुवाद, तसेच सिंधी-मराठी शब्दकोश ही त्यांची ग्रंथसंपदा आहे. प्रसिद्धीपासून दूर राहून निरलसपणे त्यांनी हे कार्य केले आहे. प्रा. हर्दवाणी हे प्रा. मधुकर तोरडमल यांच्या थिएटर ग्रुपमधील एक रंगकर्मी होते. उत्तम वक्तृत्व, विद्यार्थिप्रिय प्राध्यापक, निगर्वी, नम्र व्यक्तिमत्त्वाच्या प्रा. हर्दवाणी यांच्या हातून अनुवादाचे मौलिक काम झाले आहे. त्यांचे अभिनंदन आणि-परिषदेतर्फे त्यांच्या भावी कार्यास शुभेच्छा!

म.सा.परिषदेच्या डोंबिवली शाखेचे कार्यवाह दत्तात्रेय शंकर रानडे यांचे १२ मे २००५ रोजी अल्प आजाराने निधन झाले. कै. रानडे मूळचे मिरजचे. मिरज विद्यार्थी संघ, खरे मंदिर ग्रंथालय, वसंत व्याख्यानमाला या संस्थांचे ते कार्य करीत. महाराष्ट्र राज्य समाजकल्याण मंडळात ते अधिकारी होते. वयाच्या ऐन विशीत त्यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत सत्याग्रही म्हणून भाग घेतला होता. म.सा.प.च्या कार्यात ते तळमळीने भाग [illegible]त. त्यांच्या स्मृतीस परिषदेची आदरांजली!

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

(संपादक)

[७ गायकवाड कॉलनी, सावेडी रोड, अहमदनगर, ४१४००३]

# महाराष्ट्र साहित्य परिषद

## सन १९०६-२००६

| शताब्दी वर्षातील संकल्पित प्रकल्प | खर्च अंदाजे |
| --- | --- |
| ❖ वास्तुनिर्माण | रु. २ कोटी |
| ❖ संगणकीकरण / वेबसाईट | रु. २५ लाख |
| ❖ साहित्यिक साहाय्य निधी | रु. ५० लाख |
| ❖ अक्षरसाहित्य योजना | रु. १ कोटी ५० लाख |
| ❖ ग्रंथालय नूतनीकरण | रु. २५ लाख |
| ❖ संदर्भ ग्रंथ मायक्रोफिल्मिंग | रु. २५ लाख |
| ❖ मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७. ८ | रु. १० लाख |
| ❖ मराठी वाङ्मयाचा इतिहास : हिन्दी | रु. १० लाख |
| ❖ शाखानिहाय ग्रंथालये (४५ शाखा) | रु. ९० लाख |
| ❖ मराठीतील साहित्यकृतींचे इतर भाषांत अनुवाद | रु. २५ लाख |
| ❖ केशवसुत स्मृतिशताब्दी कविसंमेलने, चर्चासत्रे इ. | रु. १० लाख |
| ❖ व्यवस्थापन सुविधा | रु. २५ लाख |
| ❖ परीक्षा विभागाचा विकास | रु. १५ लाख |
| ❖ संशोधन व प्रकाशन विभाग | रु. ४० लाख |
| **एकूण** | **रु. ७ कोटी** |

*या संकल्पित प्रकल्पासाठी जास्तीतजास्त देणगी देऊन मराठी भाषेच्या वैभवात अधिकाधिक भर पालण्यासाठी आपण हातभार लावावा, अशी सर्व हितचिंतकांना, साहित्यप्रेमींना आणि सभासदांना विनंती आहे. आपली देणगी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' या नावाने धनादेशाद्वारे पाठवावी. या देणगीसाठी ८० G ची सुविधा उपलब्ध आहे.*

**श्री. रत्नाकर कुलकर्णी**
(कोषाध्यक्ष, म. सा. प.)

अनुक्रमणिका

म. सा. परिषदेने प्रसिद्ध केलेला मराठी वाङ्मयाच्या इतिहासासंबंधीचा
अभिमानास्पद व अपूर्व प्रकल्प

## 'A History Of Modern Marathi Literature'
### Vol. I & II

१९ वे व २० वे शतक या कालखंडातील मराठी वाङ्मयाचे समग्र, साधार व समतोल दर्शन घडविणारा ग्रंथ– दोन खंडांत

**संपादन समिती** : प्रा. ग. प्र. प्रधान, प्रा. के. ज पुरोहित,
प्रा. गो. म. कुलकर्णी, प्रा. के. रं. शिरवाडकर

**संपादक** : श्री. राजेन्द्र बनहट्टी, डॉ. गं. ना. जोगळेकर

### पहिल्या खंडातील विषय व लेखक

| | |
|---|---|
| १. साहित्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी– | डॉ. गं. ना. जोगळेकर |
| २. काव्य– | प्राचार्य शिरीष चिंधडे |
| ३. नाटक– | डॉ. वि. भा. देशपांडे |
| ४. कादंबरी– | डॉ. निशिकांत मिरजकर |
| ५. कथा– | प्राचार्य के. ज. पुरोहित |

### दुसऱ्या खंडातील विषय व लेखक

| | |
|---|---|
| ६. वैचारिक साहित्य– | प्रा. ग. प्र. प्रधान |
| ७. साहित्य समीक्षा, वाङ्मयेतिहास व संशोधन– | प्रा. के. रं. शिरवाडकर |
| ८. चरित्र, आत्मचरित्र, आठवणी– | डॉ. सुरेश धायगुडे |
| ९. ललित गद्य– | प्राचार्य शिरीष चिंधडे |
| १०. इतिहासविषयक लेखन, संशोधन– | डॉ. राजा दीक्षित |
| ११. मराठी विनोदी साहित्य– | प्राचार्य बाळ गाडगीळ |
| १२. संदर्भ साहित्य– | डॉ. सु. रा. चुनेकर |
| १३. समारोप– | डॉ. गं. ना. जोगळेकर |

This History of Modern Marathi Literature in English, a uniqe project undertaken and completed by the Maharashtra Sahity Parishad Pune, is the result of a frequntly felt need mainly by the non-Marathi readers and scholars. Complete documentation, unbiased critical approach, and comprehensive treatment make this work invaluable.

दोन्ही खंडांची मिळून मूळ किंमत : रु १,०००/-

सवलतीचे मूल्य रु. ७००/- फक्त

Orignal Price for both the Volumes : Rs. 1000/-
Available at concessional price of Rs. 700/-
Please write to– Maharashtra Sahitya Parishad Tilak Road,
Pune 411 030 India Telephone 020/24475963








# लोकप्रिय काणेकर



## रवींद्र पिंगे

चमकदार आटोपशीर लेखन आणि अनुपस्थितांची कुचाळकी सपशेल वर्ज्य असलेली रंजक वाणी, ह्या दोन सुयांनी अनंत काणेकरांनी जन्मभर लोकप्रियतेचं विणकाम केलं. सुदैवाने काणेकरांना बांधेसूद देह आणि घवघवीत चेहेरेपट्टीची देणगी निसर्गाकडून लाभलेली होती. त्याला सुसंवादी जोड म्हणजे चटेरीपटेरी साहेबी कपड्यांची जन्मजात हौस होती. नेहमी सुटाबुटात वावरायचे आणि वट कायम ठेवण्यासाठी लागणारी आर्थिक ऐपतही त्यांच्यापाशी अमोघ होती. काणेकरांनी कुणापुढे कधीही हात पसरला नाही. आवाज खणखणीत. स्पष्ट शब्दोच्चारात थोडे उणे होते; पण मार्मिक मुद्यांची त्यांच्यापाशी उपज असे. मजेशीर, हलक्याफुलक्या आठवणी गुंफत गुंफत, समोरच्याची नजरबंदी करत, काणेकर गप्पांचा अड्डा खुलवीत. वयाकडून मिळालेली वडिलकी आणि नावीन्याचं स्वागत करणारी तारुण्यसुलभ वृत्ती ह्यांच्या मिलाफामुळे काणेकर जात तिथे अध्यक्षच असत. काणेकर लोकांना हवे असत कारण त्यांच्यापाशी शिळपट काहीच नसे. अनंत काणेकर म्हणजे चैतन्याचं कारंजं होतं. काणेकर सर्वांना दिलासा द्यायचे. सर्वांना आपले वाटायचे.

साठीचा साकव पार करून झाल्यावर त्यांच्या एकेक शक्ती आटत गेल्या. काणेकरांचं म्हातारपण अंमळ लवकर ओढवलं. पंचाहत्तरीची पावटणी ओलांडू न शकलेले काणेकर प्रथम देहाने आणि मागोमाग बुद्धीने विकल होत गेले. मुंबईत झालेल्या एका रस्त्यावरील अपघातात त्यांच्या मेंदूला मुकामार बसला. त्यातून तब्बेत ढासळायला प्रारंभ झाला.

साठीनंतरचं त्यांचं लेखन फारसं कुठे दिसत नसे. राजकीय तिरंदाजी 'मराठा' मधून करायचे. तेवढंच. सभासंमेलनाचे अध्यक्ष म्हणून मात्र सर्वत्र हजेरी लावीत. सार्वजनिक कार्यकर्त्यांना ते हवे असत आणि आलेल्या प्रत्येक आमंत्रणाचा स्वीकार करणं त्यांचं सहजकर्म होतं. १९५५ पासून राज्य शासनाच्या मंत्रालयातलं सांस्कृतिक विभागाचं दफ्तर मी एकहाती सांभाळू लागलो होतो. एकदा काणेकर आले, तेव्हा ते साठीकडे झुकत होते. मला म्हणाले,

'पिंगे, तुला माहीत आहे की, मी वकिलीही केलेली आहे. फार चालली नाही ते सोड, पण दारावर वकिलीची पाटी होती. तेव्हापासून माझं एक स्वप्न आहे की, प्रतिष्ठित न्यायाधीश मंडळी आणि वकिलांची स्वतंत्र बंगल्यांची एक सोसायटी असावी, नि त्यात

माझाही बंगला असावा. आम्हांला वांद्र्याला सरकारी जमिनीचा एक ऐसपैस तुकडा मोफत हवा आहे. मी यशवंतरावांजवळ बोललो आहे. 'ठीक आहे' म्हणाले. तर तू आता हे प्रकरण जरा रेट, नि जमिनीचा तुकडा आम्हांला फुकटात मिळेल असं पाहा.'

मी थक्क झालो. म्हटलं,

'वांद्र्याची खाडी म्हणजे नुसता चिखल आहे. त्या चिखलात तुमची घरं कशी उभी कराल?'

'ते मी पाहीन. अमेरिकेत फोर्ड फाउंन्डेशन आहे. खाडीतला चिखल उपसून तिथे सिमेंटचा पाया भरण्यासाठी लागणारी ग्रँट मी तिकडून आणेन. प्रश्न डॉलर्सचा नाही, जमिनीचा ताबा मोफत मिळण्याचा आहे. तेवढं तू कर. पुढचं मी बघतो.'

काणेकरांचं हे स्वप्न हवेत विरलं. त्याऐवजी कलाकारांसाठी स्वतंत्र बंगल्यांचं 'कलानगर' आणि साहित्यसेवकांसाठी गाळेपद्धतीची 'साहित्य सहवास' सोसायटी उभारण्याचे निर्णय झाले. काणेकर निराश झाले नाहीत. त्यांनी एकरकमी रोख पैसे मोजून 'साहित्यसहवास' मध्ये दोन गाळे खरीदले. अगदी पहिल्या दिवसापासून अखेरच्या दिवसापर्यंत काणेकर आपल्या मालकीच्या जोड-गाळ्यामध्येच ऐटीत राहिले. अयाचित वृत्तीनं झोकात राहणं हा काणेकरांचा विशेष होता.

दुसरी बाब म्हणजे काणेकरांकडे कडवटपणा नव्हता. शासनाच्या वाङ्मयीन पारितोषिकांच्या योजनेची सुरुवात झाली, तेव्हा काणेकरांनी आपला एक संग्रह स्पर्धेसाठी पाठवला. त्यांना दुय्यम-तिय्यम क्रमांकाचं बक्षीस विभागून मिळालं! काणेकरांचा एकूण दरारा पाहता तो त्यांचा उपमर्द होता. आम्ही खट्टावलो, पण काणेकरांनी नाराजी किंवा निषेध व्यक्त केला नाही. धनादेश सुहास्यवदने स्वीकारिला नि बँकेत भरला. ह्या कानाचं त्या कानाला झालं नाही.

काणेकरांचा जन्म २ डिसेंबर १९०५ रोजी एका पोलीस हवालदाराच्या कुटुंबात, महारबावडी पोलीस स्टेशनच्या सिमेटाच्या चाळीत झाला. मुंबईतल्या गिरगावात त्या जुन्या चाळी आहेत. दुर्दैवाने काणेकरांचे वडील फारच लवकर वारले. काणेकरांची आई जेमतेम शिकलेली होती. तिने महर्षी कर्व्यांचं हिंगणं गाठलं नि ती परिचारिका झाली. काणेकर हे एकुलतं एक अपत्य. त्यांचा सांभाळ आजोळच्या मंडळींनी करायला हवा होता. पण काणेकरांच्या आईचे वडील एडनला डॉक्टर होते! म्हणून काणेकर गिरगावातल्या परमानंदांच्या सुधारकी कुटुंबात लहानाचे मोठे झाले. प्रार्थना समाजाचे पुढारी आणि महात्मा फुल्यांचे मित्र मामा परमानंद हे काणेकरांच्या आईचे चुलत आजोबा. ती मामा परमानंदांच्या कुळातली. वैश्यवाणी काणेकर सुधारकी विचाराचे; परंतु जातिव्यवस्थेत त्यांना वैचारिक पातळीवर रस होता. वैश्यवाण्यांमध्ये अनेक स्तर आहेत. ते पिंजून सांगताना काणेकर रंगून जात. म्हणत, 'चिपळूणचे वैश्य वेगळे नि प्रभानवल्लीचे वैश्य वेगळे. मालवणचे तर अजिबात वेगळे. मी मालवणचा वैश्य आहे, पण वाढलो मुंबईत.'

अनंत काणेकरांचं शिक्षण गिरगावातल्या 'चिकित्सक' शाळेत झालं. अभ्यासात

काणेकर तल्लख होते. पत्रकार चं. वि. बावडेकर, नाटककार मो. ग. रांगणेकर हे त्यांचे वर्गमित्र. शालेय जीवनात काणेकरांना अवांतर वाचनाची चटक लागली हाती पडेल ते चिटोरं ते वाचून काढीत. चौदाव्या, पंधराव्या वर्षीच डिकन्सच्या कादंबऱ्या वाचून काढल्याचं त्यांनी एका मुलाखतीत सांगितलं होतं. काणेकरांचा संस्कृत विषय पक्का होता. मॅट्रिकनंतर ते झेविअर महाविद्यालयात गेले. के. नारायण काळे हे काणेकरांचे तिथले सहाध्यायी. काणेकर कविता करीत; पण कुणाला न सांगता त्या एका वहीत गुपचूप लिहून ठेवीत. ती वही के. नारायण काळ्यांच्या हाती पडली नि नंतर त्या कवितांना 'रत्नाकर' मधून प्रसिद्धी देण्याचं सव्यापसव्य काळ्यांनी उमाळ्याने उरकलं. त्यातून 'चांदरात' ह्या नितांतसुंदर कविता-संग्रहाचा जन्म झाला. मराठी भावकवितेच्या इतिहासात एक सोनेरी पर्व सुरू झालं. 'एकलेपणाची आग' वगैरे बहारदार कविता, 'आंधळ्यांची शाळा' ह्या 'नाट्यमन्वंतर' च्या नाटकात गेल्या. सुदैवी काणेकरांच्या आशयउन्नत आर्त भावगीताला ज्योत्स्ना भोळे ह्या तत्कालीन तरुण गायिकेचा स्वर्गीय गळा लाभला आणि त्या गाण्याचं सोनं झालं. दर्जेदार भावगीतकार म्हणून काणेकरांचा आणि मिठ्ठास गळ्याची गायिका म्हणून ज्योत्स्ना भोळे ह्यांचा सांस्कृतिक जगात जन्म झाला. ती ख्याती दोघांनाही जन्मभर पुरली.

वकिलीचा सनद घेतल्यावर काणेकर पत्रकारितेत उतरले. 'चित्रा' हे चुणचुणीत साप्ताहिक रांगणेकरांच्या सहकार्यानं सुरू केलं. एकदा एक छापखानेवाला त्यांना म्हणाला, 'मी पैसे घालतो, तुम्ही एक दैनिक मुंबईत संपादित करा.' काणेकरांना पटलं. त्यांनी लागलीच 'नवजवान' नावाचं दैनिक सुरू केलं. सगळा एकहाती कारभार. दैनिकाचा सगळा मजकूर काणेकर लिहायचे. पाचव्या दिवशी त्यांनी जळजळीत अग्रलेख लिहिला. ब्रिटिश शासनाने डोळे वटारले. जबर दंड ठोठावला. तो भरणं अशक्य झाल्यानं 'नवजवान' हे मराठी दैनिक पाच दिवसांच्या कारकीर्दीनंतर बंद करण्यात आलं. अवघे पाच दिवस मराठी दैनिक चालविणं हा विक्रम काणेकरांच्या नावावर आहे!

काणेकरांनी मुंबईच्या रेडिओ स्टेशनावर एक्झिक्यूटिव्ह म्हणून नोकरीला यावं अशी त्यावेळचे तिथले सर्वेसर्वा झेड. ए. बुखारींची तीव्र इच्छा होती; पण सरकारी सेवेच्या नियमात लिहिण्याचं स्वातंत्र्य तेव्हा बसत नव्हतं. म्हणून काणेकर रेडिओचे साहेब झाले नाहीत. मात्र, रेडिओ हे प्रभावी माध्यम आहे हे ध्यानात आल्यामुळे काणेकर अगदी १९३५ पासून रेडिओवर संवाद लिहू लागले. भान जागृत असल्यामुळे त्यांनी उमेदवारीच्या काळात झेड. ए. बुखारींची व्यक्तिरेखा लिहिली.

त्यावेळी 'खालसा' हे सकाळचं पहिलं महाविद्यालय माटुंग्याला सुरू झालं. काणेकरांची तिथे व्याख्याता म्हणून नेमणूक झाली. नंतर डॉ. आंबेडकरांचं 'सिद्धार्थ महाविद्यालय' फोर्टमध्ये झालं, तेव्हा काणेकर ह्या नव्या महाविद्यालयात मराठी विभागप्रमुख म्हणून रुजू झाले.

प्रदीर्घ सेवेनंतर काणेकर 'सिद्धार्थ' मधून सन्मानाने निवृत्त झाले. दरम्यानच्या काळात










त्यांचं आणि आचार्य अत्रे ह्यांचं गोत्र जुळलं. अरुण वाचन माला, मंगल वाचन मला, वगैरे क्रमिक पुस्तकं तेव्हा सुरू झाली होती. त्यात काणेकरांचे लघुनिबंध प्रसिद्ध झाले. एका पिढीने ते वाचले. त्याचा त्यांना फायदा मिळाला. 'माणूस' ह्या 'प्रभात' चित्रपटाचे संवाद आणि गीतं काणेकरांनीच लिहिली. हे अष्टपैलुत्व काणेकरांना योग्य वळणावर पावलं नि त्यांचा उदोउदो सर्वत्र दिमाखात झाला. त्यावेळच्या मुंबई शासनाचे श्री. शहा नावाचे गुजराथी प्रसिद्धी- प्रमुख होते. त्यांनी शासकीय पातळीवरल्या अनेक मंडळांवर काणेकरांची नेमणूक केली. पंजाब शासनाने भाक्रा नांगल धरणाची पाहणी करण्यासाठी मराठी भाषेचे प्रतिनिधी म्हणून काणेकरांना निवडलं. काणेकरांनी परतल्यावर सुरेख वृत्तांत लिहिला व परचुरे प्रकाशनाने ते चिमुकलं पुस्तक प्रकाशित केलं. लेखकांच्या पथकातून ते अमेरिकेलाही पाहुणे म्हणून जाऊन आले. त्याच्या अगोदर, स्वातंत्र्य मिळाल्यानंतर, काणेकर आणि चित्रकार दलाल हे दोघे उत्तर भारताची धावती सफर करून आले. त्याचा चटपटीत वृत्तांत काणेकरांनी लिहिला आणि दलालांनी रेखाचित्रं काढली. 'मौज' प्रकाशनाचं पहिलं पुस्तक म्हणून तो एकूण ऐवज 'आमची माती, आमचं आकाश' ह्या शीर्षकान प्रसिद्ध झाला. मराठीतलं ते एक अतिशय रंजक प्रवासवर्णन आहे. पु. ल. देशपांडे मात्र चेष्टेने सांगायचे, त्या पुस्तकातला मजकूर दलालांचा असून चित्रं काणेकरांनी काढलेली आहेत! काणेकरांनी अनेक स्वतंत्र आणि अनुवादित कथा लिहिल्या. त्यांचा 'सावल्यांची राई' हा समग्र संग्रह परचुरे प्रकाशनाने काढला असून त्याला आचार्य अत्र्यांची प्रस्तावना आहे.

नंतर काणेकरांचं पत्रकारितेव्यतिरिक्त ललितलेखन मंदावलं व्याख्यानबाजी आणि त्यानिमित्त घडणारा प्रवास मात्र सुखेनैव वाढला. ऐकावं तेव्हा काणेकर व्याख्याते म्हणून गावी गेलेले असत. व्याख्यानं झोडणं, आरामात प्रवास करणं, गप्पाष्टकं रंगवणं आणि मद्यप्रेम, ह्या साठीनंतरच्या त्यांच्या खास आवडी होत्या. आकाशवाणीवर अधूनमधून येत. मी तिथल्या मराठी वाङ्मय विभागाची सूत्रं हातात घेतल्यावर काणेकरांना वारंवार भाषणांसाठी बोलावू लागलो. त्यांचं मानधनही वाढवलं. दीड महिन्यांच्या अंतराने त्यांच्या आकाशवाणीच्या मुंबई केंद्रावर फेऱ्या होऊ लागल्या. त्यांनी इतकी भाषणं आकाशवाणीवरून केली, मात्र लक्षात ठेवावं असं एकही नव्हतं. सगळी कामचलाऊ होती. मात्र, आल्यानंतर ते संभाषणात मजेशीर हकीगती ऐकवत. त्यापैकी काही उद्धृत करीत आहे.

१) पैसे मिळविण्यासाठी मी सतत धडपडत असे. अगदी प्रारंभी मी मुबई नगरपालिकेच्या जनसंपर्क विभागात नोकरी केली. पण ते वातावरण मला मानवेना म्हणून राजीनामा खरडला. नंतर माझ्या मालकीची स्वतंत्र जाहिरात कंपनी काढली. नाव ठेवलं, 'व्हिज्युअल ॲडव्हर्टायझिंग कॉर्पोरेशन'. त्यावेळी मुंबईत आजच्यासारखं प्रकाशाचं राज्य नव्हतं. काळोख असे. अशा अंधारात मी विजेच्या कांड्यांनी मालाच्या नावांची जाहिरात करायचो. माझ्या प्रकाशमान जाहिराती लोकप्रियही झाल्या. पण तो व्याप माझ्याच्याने झेपेना म्हणून मी कंपनी बंद केली. त्यानंतर मित्र शृंगारपुरे ह्याच्या भागीदारीत मी बदामी कोळसा तयार करणारी एक

वखार उरणला सुरू केली. तिचं नाव ठेवलं 'कार्बन फ्युएल कंपनी' आणि तयार होणाऱ्या बदामी कोळश्याचं नाव 'गंडेरी कोल'. एका पारश्यानं ही वखार भरपूर पैसे देऊन विकत घेतली. आम्ही ती विकली. नंतर अचानक वादळी पाऊस कोसळून वखार उद्ध्वस्त झाली नि पारशी धंद्यातून उठला. आम्ही बचावलो!'

२) मी गिरगावात कॉन्ट्रॅक्टर चाळीत राहायचो. तिथे स्वातंत्र्यपूर्व काळात पं. नेहरूंचं भाषण ठरलं. पण अध्यक्ष मिळेना. मग मलाच अध्यक्ष नेमलं. पंडित नेहरूंचं भाषण माझ्या अध्यक्षतेखाली झालेलं आहे!

३) एकदा मी आणि शामराव ओक चाललो होतो. रस्त्यातल्या रद्दीत आम्हांला गोल्डस्मिथच्या दोन नाटकांचा संग्रह एका रुपायाला मिळाला. मी आठ आणे दिले. शामरावांनीही आठ आणे दिले. मग शामरावांनी त्या संग्रहाचे दोन तुकडे केले. 'शी स्टूप्स टू काँकर' हे नाटक त्यांनी मला दिलं आणि 'गूड मॅन' हे नाटक स्वत:कडे ठेवून घेतलं. मी 'शी स्टूप्स' वाचलं. मला आवडलं. हंसा वाडकरांचे यजमान बंदरकर माझे मित्र होते. त्यांच्या नाट्यसंस्थेसाठी तातडीने एक नवं नाटक लिहून हवं होतं, त्यांनी मला विचारलं. मी लगोलग गोल्डस्मिथच्या माझ्याजवळ असलेल्या नाटकाचं रूपांतर करून दिलं– 'निशिकांताची नवरी'. ते त्यावेळी फार लोकप्रिय झालं. माझं पहिलं रूपांतरित नाटक म्हणजे इब्सेनच्या 'डॉल्स हाऊस'चं 'घरकुल'. त्यानंतर तिसरं रूपांतरित नाटक 'फास'. ही सगळी रूपांतरं मी नाट्यनिर्मात्यांसाठी केली. माझं स्वतंत्र नाटक नाही.

४) लघुनिबंधकार म्हणून माझा उल्लेख होतो. खरी गोष्ट अशी आहे की, माझे मित्र प्रभाकरपंत कोल्हटकर 'संजीवनी' नावाचं मासिक चालवीत असत. बत्तीस पानांचा अंक. एकदा त्यांच्याकडे फक्त एकतीस पानांचा मजकूर छापून झाला नि बत्तीसावं पान रिकामं राहिलं. मला ते म्हणाले, 'अंकातलं एक पान कोरं ठेवणं वाईट दिसतं, तुम्ही मला फक्त एका पानाचा मजकूर लिहून द्या. विषय कुठलाही निवडा, पण माझं एक पान उभं करा.' मग मला सुचलं ते मी एका पानात मांडलं, वाचकांना ते माझं शेवटचं पान आवडलं. हलकं- फुलकं वाटलं. मग दुसऱ्या महिन्याला संपादकाने तीच मागणी पुन्हा केली : 'फक्त एक पान भरेल इतका छोटेखानी मजकूर द्या.' मी दिला. वाचकांना तो आवडला. फक्त एका पानात आटोपशीरपणे कुठलाही विषय मांडायचा. मग मी तेच वळण चालू ठेवलं. हाच माझ्या लघुनिबंधांचा उगम. केवळ गरजेपोटी त्याची निर्मिती झाली. पुढे मी तो अधिक घाटदार केला नि तो पाठ्यपुस्तकात गेला. त्याला प्रतिष्ठा आणि लोकप्रियता लाभली.

५) रशियात लेनिनने राज्यक्रांती केली. कामगारांचं राज्य स्थापन झालं. त्यामुळे आम्हां तरुणांना रशिया बघण्याची इच्छा झाली; पण जवळ पैसेही नाहीत आणि ब्रिटिश सरकार आम्हांला जाऊही देणार नव्हतं. इतक्यात सहाव्या जॉर्जच्या राज्यारोहण समारंभाची लंडनला तयारी सुरू झाली आणि त्या समारंभाला हजर राहण्यासाठी त्यावेळच्या बोट कंपन्यांनी लंडन प्रवासाची सवलतीच्या तिकीटांची घोषणा केली. मुंबई-लंडन समुद्रमार्गे भाडं अवघं



अनुक्रमणिका






तीनशे रुपये. मी लंडनला जायचं नि तिथून परस्पर रशियाला जायचं ठरवलं. त्याप्रमाणे लंडनला गेलो नि तिथून रशियात भटकलो. दोन महिन्यांचा एकूण खर्च फक्त एकोणीसशे रुपये आला. पण तेवढेही पैसे माझ्यापाशी नव्हते. मग पगाराची आगाऊ रक्कम घेतली. किर्लोस्करांनी संकल्पित प्रवासलेखमालेचं आगाऊ मानधन दिलं. अशी ओढाताण करून रक्कम जमवली नि लंडनमार्गे रशियात पोहोचलो. परतल्यावर ब्रिटिश सरकारनं माझा पासपोर्ट जप्त केला! अशा रीतीने 'धुक्यातून लाल ताऱ्याकडे' हे माझं पहिलं प्रवासवर्णन तयार झालं नंतर मी त्या प्रवासावर शेकडो भाषणं दिली!

असे हे सुदैवी अनंत काणेकर. योग्य वळणावर योग्य दिशेला चालत गेलेले. अजातशत्रू लेखनाची कधीही टंगळमंगळ केली नाही. अखेर लेखनसातत्यच पावतं, ह्यावर विश्वास ठेवला. कादंबरीचा अपवाद सोडून सर्वप्रकारचं लेखन चटपटीतपणे वेगात केलं. सर्वत्र भ्रमण केलं. सगळीकडे भाषणं दिली. त्यामुळे जनसंपर्क वाढला. पाठ्यपुस्तकातले त्यांचे वेचे लोकप्रिय झाले. विवेकाने संसारयात्रा सुफलित केली. त्यांचं पहिलं लग्न रेखा बांदेकर हिच्याशी झालं. ती गेल्यावर दुसरा विवाह साताऱ्याच्या सुविद्य कु. कमल दीक्षित ह्यांच्याशी झाला. त्या हयात असून त्यांचं अठ्ठ्याऐंशीवं वर्ष चालू आहे. त्या वांद्र्याला साहित्य-सहवासमध्ये नातवंडांसह राहतात. काणेकरांना एकूण चार मुलं. दोन्ही मुलगे आज हयात नाहीत. दोन मुलींचे संसार चालू आहेत. श्रीमती कमलताईंनी यजमानांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'अनन्वित' नावाचा एक छोटेखानी संग्रह नुकताच संपादित केला असून त्यात अनंत काणेकरांच्या बहुविध कामांवर प्रकाश टाकणारे लेख आहेत. परिशिष्टात काणेकरांबद्दल तारीखवार माहिती दिली आहे. संग्रहाला संदर्भमूल्य आहे. खुद्द कमलताईंचा काणेकरांवर चांगला लेख आहे.

लाटा येतात, लाटा जातात. तो निसर्गक्रम आहे. एके काळी लोकप्रियतेच्या लाटेवर आरूढ झालेले अनंत काणेकर आज वाङ्मयीन इतिहासातले मैलाचे दगड झाले आहेत. मे १९८० ला ते गेले. चालू पिढीला काणेकरांबद्दल अगत्य नाही म्हणून कमलताई रंजिस आल्या आहेत. काणेकरांच्या मृत्यूनंतर त्या दरवर्षी काणेकरांच्या नावाने तीन हजार रुपयांचा रोख पुरस्कार एका चांगल्या लेखकाला देत असत. पंचवीस वर्षं पैसे वाटले; पण आता कुणालाच त्याचं अप्रूप राहिलेलं नाही. लाभार्थीच विचारतात, 'कोण हे काणेकर?' म्हणून ताईंनी तो पुरस्कार देण्याचंही रहित केलंय. त्यांचंही सोयरसुतक कुणाला नाही. आजचं वास्तव हे असं विद्रूप आहे. चालायचंच. लाटा येतात, लाटा जातात. माझी भावना वेगळी आहे. लेखन प्रेमाने बहरून गेलेल्या अशा गोड माणसाशी माझा घरोबा सलग चाळीस वर्षं अबाधित राहिला.

**रवींद्र पिंगे**

एच २२, मैत्रेय बाग सोसायटी, कोथरूड बस डेपो परिसर, पौड मार्ग, कोथरूड, पुणे ३८. दूरभाष : (९५२०) २५२८३३९०

# अनंत काणेकर (२ डिसेंबर १९०५ ते ४ मे १९८०)

## जन्मशताब्दीनिमित्त एक विहंगमावलोकन

१९५७ च्या औरंगाबाद येथील साहित्य संमेलनाचे अध्यक्ष-अनंत आत्माराम काणेकर हे मराठी साहित्यात कवी, पत्रकार, लघुनिबंधकार, कथाकार, नाटककार, प्रवासवर्णनकार, आत्मचरित्रकार, अशा बहुविध रूपांत वाङ्मयीन कामगिरी करणारे सुप्रसिद्ध नाव आहे. भारत सरकारने 'पद्मश्री' देऊन त्यांना गौरविले, तसेच सोवियत लँड नेहरू पारितोषिकाचेही ते मानकरी झाले. जन्माने आणि वास्तव्याने ते मुंबईकर! संस्कृत-इंग्रजी विषयांत बी.ए. आणि नंतर एल्.एल.बी. करून ते वकिली व्यवसायात उतरले. त्यात ते रमले नाहीत. खालसा महाविद्यालय आणि सिद्धार्थ महाविद्यालयात त्यांनी मराठी शिकवले. १९३० ते १९८० अशी अखंड पन्नास वर्षे ते लेखनकार्यात खऱ्या अर्थाने रमले.

'चांदरात आणि इतर कविता' (१९३३) हा काव्यसंग्रह. 'इब्सेन'च्या 'डॉल्स हाऊस'चे 'घरकुल' (१९२७) हे रूपांतर, तसेच 'निशिकान्ताची नवरी' (१९३८), 'झुंज' (१९५४) ही नाटके, 'धूर आणि इतर एकांकिका' (१९४१) व 'सांबर आणि इतर एकांकिका' (१९४१) हे एकांकिका संग्रह ही नाट्यलेखनसंपदा आणि 'नाट्यमन्वंतर' त्या नाट्यचळवळीचे संस्थापक म्हणून त्यांचे नाव अग्रगण्य आहे. 'चौकोनी आकाश' हा सुधारित काव्यसंग्रह १९७४ मध्ये रमेश तेंडुलकरांनी संपादित केला.

'धुक्यातून लाल ताऱ्याकडे' (१९४०), 'आमची माती आमचे आकाश' (१९५७), 'सोनेरी उन्हात पाचूची बेटे' (१९५९), 'खडक कोरतात आकाश' (१९६५), 'लाल ताऱ्याच्या प्रकाशात' (१९६७) ही प्रवासवर्णने लोकप्रिय झाली.

'जागत्या छाया' (१९३५), 'मोरपिसे' (१९४०), 'दिव्यावरती अंधेर' (१९४०), 'काळी मेहुणी व इतर कथा' (१९४२) हे कथासंग्रह आणि 'रुपेरी वाळू' रूपककथा / लघुनिबंधकार म्हणून अनंत काणेकरांच्या लेखनाचा ठसा– 'पिकली पाने' (१९३४), 'शिंपले आणि मोती' (१९३६), 'तुटलेले तारे' (१९३८), 'उघड्या खिडक्या' (१९४५), 'पांढरी शिडे' (१९५७), 'खिडकीतले तारे' (१९६४), 'प्रकाशाची दारे' (१९७०) इ. संग्रहातून चिरस्मरणीय आहे.

'अनंतिका' नावाने त्यांचे आत्मचरित्र १९७९ मध्ये प्रकाशित झाले.

प्रसन्न, मिश्कील व सहजसुंदर लेखनशैलीतील त्यांचे स्फुटलेखन, 'नवयुग' आणि 'चित्रा' साप्ताहिकांतून प्रसिद्ध झाले.

मार्क्सवादाचा प्रभाव असलेले काहीसे जहाल विचारसरणीचे अनंत काणेकर मराठी साहित्यसृष्टीत रसिक, चैतन्यशील व चिंतनशील लेखक म्हणून स्थिरावले.

त्यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांच्या स्मृतीला अभिवादन.

**– संपादक**



अनुक्रमणिका






# मराठी ग्रंथ-सूचीकाराच्या कै. शंकर गणेश दाते
## यांच्या जन्मशताब्दीनिमित्त



**म. श्री. दीक्षित**

'मराठी-ग्रंथ-सूची'कार शंकर गणेश दाते (१९०५ ते १९६४) यांची जन्मशताब्दी येत्या १७ ऑगस्ट रोजी येत आहे. ज्ञानोपासक असणाऱ्या सर्वांनी आणि साहित्यसंस्थांनी ती कृतज्ञतेच्या भावनेने कर्तव्य म्हणून साजरी करावी अशी अपेक्षा आहे. शं. ग. दाते हे नक्कीच अशा योग्यतेचे गृहस्थ होते. त्यांना जाऊन आता चाळीस वर्षे होतील. नव्या पेठेतील एका बैठ्या साध्या अशा स्वत:च्या घरात ते राहत असतात. त्यांचा माझा चांगला परिचय होता.

शंकरराव कॅन्सरने वारले त्याच्याआधी चार की पाच दिवस दत्तो वामन पोतदार यांचे समवेत मी समाचाराला गेलो होतो. समोरच्या दर्शनी खोलीत ते कॉटवर सिगरेट ओढत निवांत पहुडले होते. आम्ही दिसताच थोडं उठले नि तक्क्याला टेकून बसले. मग तिथेच थोडा संवाद घडला.

"काय शंकरराव? तब्येत काय म्हणते?" द. वा. पो.

"ही अशी आहे." झुरका मारत दाते.

"अहो, काय हे! अजून सिगारेट ओढता-"

"ओढतो. ती मरेपर्यंत सुटणार नाही. ती ओढत आलो म्हणून सूचीकार्य घडले मेहेरबान."

"ठीक आहे ओढा. येतो येतो म्हणता आज आलो भेटीला दीक्षिताला घेऊन-"

"आभारी आहे. पडतो मी-"

"आम्ही येतो-"

"बराय. नमस्कार."

दाते जाणारच होते. चारपाच दिवसांनी म्हणजे १० डिसेंबर १९६४ रोजी दुपारी ते गेले. त्यांच्या अंत्ययात्रेला मी हजर होतो. त्यांचे माघारी पत्नी मंदाकिनीताई आणि तरुण पुत्र होता. शेजारी कुंटे ऊर्फ 'सुशील परभृत' हे लेखक होते. दाते आणि हे कुंटे साडू होते. पण दोघात बोलणे क्वचितच होई. बहिणीबहिणी मात्र एकमेकींकडे जात नि बोलत असत.

कै. शंकरराव दाते हा एकूण उग्रप्रकृती गृहस्थ होता. याउलट मंदाताई हसतमुख, सोशिक होत्या. बोलणी खात, अपमान सोसत, त्यांनी दाते यांच्याबरोबर संसार केला. त्यांची अखेरपर्यंत सेवाशुश्रूषा केली. त्यांना मधुमेह होता. डॉ. दिनकर ढमढेरे यांचेकडून त्या प्राय: रोज इंजेक्शन घेत. वारल्या कधी ते मला कळलेच नाही. त्यामुळे चुटपूट लागली.

'मराठी ग्रंथ सूची'कार दाते यांनी डोंगराएवढे उभे केलेले त्रिखंडात्मक कार्य साहित्य वर्तुळात सर्वज्ञात असल्यामुळे त्याविषयी नव्याने सांगण्याची फार आवश्यकता नाही. पंचवीस-एक वर्षे पुणे, मुंबई, ठाणे, बडोदा, इंदोर, ग्वाल्हेर, नागपूर, विदर्भ, तंजावर इ. ठिकाणची ग्रंथालये तसेच अनेकांची वैयक्तिक ग्रंथालये पाहून त्यांनी स्वत: नोंदी केल्या नि प्राय: एकट्याच्या हिमतीवर बुधवारातील सरदेसाई यांच्या 'समर्थ भारत' छापखान्यात आपले सूचीखंड छापले. **एकट्याच्या बळावर एकटाकी झालेला १५० वर्षांमधील मुद्रित ग्रंथांचा असा वर्णनात्मक कोश भारतात अन्य कुठल्याही भाषेत झालेला नाही.** १८०० ते १९३७ (पहिला खंड भाग २) आणि १९३८ ते १९५० (दुसरा खंड) अनुक्रमे १९४३ आणि १९६१ साली प्रकाशित झाले आहेत. ग्रंथसूचीच्या आधी दाते यांनी 'मराठी लोककथा'ही दोन भागांत संग्रहित केल्या आहेत.

कै. दाते फार स्वाभिमानी, एकांडे, काहीसे तुसडे, पण ध्येयवादी, जिद्दी गृहस्थ होते. त्यांची राहणी साधी होती. पांढरी स्वच्छ पँट, खोचलेला हाफशर्ट, डोळ्यावर चष्मा या वेषात ते नित्य वावरत. व्यसन असे एकच. धूम्रपान. अति धूम्रपान. सदाशिव पेठेतील 'पेशवाई' हॉटेलात दुपारी ते अधूनमधून चहाला येत. तिथेही दोन-तीन सिगारेट्स ओढत असत. त्यांच्या घरी उतरायला येणारे एकच जोडपे होते– अ. का. प्रियोळकर. यांचेखेरीज त्यांचे घरी कोणी पाहुणा आल्याचे मला तरी माहीत नाही.

दाते यांच्या सूचीच्या द्वितीय खंडाचे प्रकाशन साहित्य परिषदेत मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांच्या हस्ते 'दवापों'चे अध्यक्षतेखाली (मुख्यत: माझ्या प्रयत्नाने) झाले होते. या ना त्या रूपाने त्यांचा गौरव व्हावा हा यामागचा हेतू होता. पण त्यांचा स्वभाव असा चक्रम की, समारंभ झाल्यानंतर मी त्यांना परिषदेला खंडाची प्रत भेटीदाखल द्या अशी विनंती केली तेव्हा त्यांनी जे काय ऐकवलं ते लिहिण्यासारखं नाही. इतकं करून परिषदेत वारंवार येत.

ज्ञानकोशकार केतकर, य. रा. दाते. चिं. ग. कर्वे, चांदोरकर, चित्रावशास्त्री, इ. कोशकारांच्या उज्ज्वल परंपरेत शोभून दिसणारे शंकरराव दाते तसे अकालीच गेले. सूचीच्या दुसऱ्या खंडाला साहित्य अकादमी, मुंबई सरकारचे शिक्षणखाते, पुणे विद्यापीठ या संस्थांनी त्यांना अर्थसहाय्य केले होते. मुख्यमंत्री बाळासाहेब खेर यांचीही त्यांच्यावर कृपा होती. पण एवढ्याने भागणारे नव्हते. दाते यांनी पंचवीस-तीस वर्षे भ्रमंती करून जे अपार कष्ट केले, काटकसरीने संसार केला आणि आमरण ग्रंथसूची, नियतकालिकांची सूची यासाठीच आयुष्य वेचले त्याचे मोल कोण कसे करणार? गं. बा. सरदार, दि. के. बेडेकर या दोघांनी दाते यांचे सूचीकार्य लक्षात घेऊन त्यांच्या स्वाभिमानाला धक्का लागणार नाही अशा बेताने

त्यांना शासनाकडून काही साहाय्य केल्याचे मला स्मरते. पण दाते यानंतर फार दिवस जगले नाहीत. त्यांचे माघारी 'दाते सूची मंडळ' नावाची संस्था, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या पुढाकारामुळे स्थापन झाली. तिचे कार्यालय दाते यांच्याच घरात होते. अजूनही आहे. कै. दि. वि. काळे, कै. शं. ना. बर्वे, श्री. व. भि. बेलसरे, बोरगावकर यांनी बहुत निष्ठेने आणि कष्ट उपसून मराठी नियतकालिकांच्या लेखसूचीचे चार खंड काढले. कै. दाते यांचे अपुरे कार्य बहुतांशी पूर्ण केल्याबद्दल या मंडळींना धन्यवाद द्यावेत तेवढे थोडे आहेत.

पुण्यातील नव्या पेठेच्या बाजूला जाणे झाले की माझी दाते यांच्या घराकडे आपसूक नजर जाते. आणि बघावे तो दाराला कुलूप असते. त्यांचा कर्ता, संसारी मुलगा मुंबईला असतो. जेमतेम बी.ए.पर्यंत शिक्षण असणाऱ्या या थोर ग्रंथ-सूचीकाराला मनोमनी वंदन करून मी पुढे चालू लागतो.

❑

---

## साभार पोच

**ऑपरेशन यमू :** मकरंद साठे, पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि. मुंबई, पृष्ठ १०६
**आणि माझी आई :** ज्ञानेश मोरे, वीणा प्रकाशन, जळगाव, पृष्ठ २८
**पापण्यांचे काठ ओले :** नीळकृष्ण देशपांडे, शुभश्री प्रकाशन, पुसद, पृष्ठ ४८
**चिवित्रा :** गिरीश ओक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ १५६
**दिवेलागणीची वेळ :** ना. धों. महानोर, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ ११२
**तद्भव :** रवींद्र शोभणे, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ १६८
**मत्स्यालय :** चंद्रशेखर हिरवे, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ ४०
**शेळीपालन :** विलास गाजरे, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ ८०
**अजंठा, वेरूळ, औरंगाबाद :** ब्रह्मानंद देशपांडे, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ १२०
**भेट कांगारूंची स्मरते :** सुजाता जोशी-पाटोदेकर, इसाप प्रकाशन, नांदेड, पृष्ठ ९६
**रसगंध :** नीर शबनम, विजय प्रकाशन, नागपूर, पृष्ठ ७८
**मेघवृष्टी :** जयराम खेडेकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ११२
**युगान्त :** सु. वि. पारखी, शिवम प्रकाशन, पुणे, पृष्ठ ७२७
**भूमी :** आशा बगे, मौज प्रकाशन गृह, मुंबई, पृष्ठ २६२
**गमाडी गंमत :** प्रतिभा प्र. गारटकर, राजश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२
**देवदूत :** संजीव शहा, प्रकाशिका ज्योती शहा, सोलापूर, पृष्ठ १८८
**आठवणीचे आभाळ :** काशिनाथ चौधरी, वीणा प्रकाशन, जळगाव, पृष्ठ ५४
**सोन्याचा चमत्कार :** रजनी राज अहेरराव, सुयश प्रकाशन, सांगवी, पृष्ठ ३४
**पोएम झाली कविता :** शशिकला गोरे, उषा अनिल प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८०

# ११ वे विभागीय साहित्य संमेलन : अध्यक्षीय भाषण



**ह. मो. मराठे**

*(महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने भरणारे विभागीय साहित्य संमेलन खेड (जिल्हा रत्नागिरी) येथे जानेवारीच्या १५ आणि १६ तारखांना झाले. या संमेलनाचे अध्यक्ष म्हणून साहित्यिक पत्रकार ह. मो. मराठे यांची निवड झाली. त्यांचे हे छोटेसे अध्यक्षीय भाषण.)*

मित्रहो,

महाराष्ट्र साहित्य परिषद आणि तिची खेड शाखा यांच्या वतीने भरविण्यात येत असलेल्या या विभागीय साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी माझी निवड आपण केली याबद्दल मी आपला आभारी आहे.

मी साहित्य-समीक्षक नाही. कारण, मी मराठीचा प्राध्यापक नाही. मराठीचा प्राध्यापक असतो तर मी पदसिद्ध समीक्षक झालोच असतो! मी खूप खूप वर्षांपूर्वी मराठीचा प्राध्यापक होतो, पण प्राध्यापकी सोडून मी पत्रकारितेत आलो. आपणाला समीक्षक व्हायचं नाही तर लेखक व्हायचं आहे, अशी ओढ मनाला वाटतच होती. योगायोगाने माझी प्राध्यापकीही फार लवकर संपुष्टात आली, आणि मी सरळ पत्रकारितेची वाट धरली. तेव्हापासून मी एकाक्ष माणसाप्रमाणे वागत आहे. मला फक्त एकच डोळा आहे– ललित लेखकाचा! दुसरा डोळा नाही– समीक्षकाचा! त्यामुळे मी साहित्य समीक्षा वगैरे करण्याच्या भानगडीत पडतच नाही. सुचलं आणि कोणी मागितलं तर कथा-कादंबऱ्यांच्या स्वरूपाचं ललित लेखन करतो. त्याचा दर्जा काय आहे याची काळजी करीत नाही. शे-दीडशे कथा लिहिल्या तर त्यांतल्या दहा-पंधरा तरी चांगल्या उतरतात; पाच-पंचवीस कादंबऱ्या लिहिल्या तर त्यांतल्या चारपाच चांगल्या होतात, असा माझा अनुभव आहे. बहुतेक 'प्रॅक्टिसिंग रायटर्स' म्हणजे लिहित्या हाताचे लेखक असाच विचार करीत असावेत, असा माझा तर्क आहे. श्रेष्ठ-श्रेष्ठ म्हणून गाजत असणाऱ्या बहुतेक लेखकांच्या लिखाणात साधारणपणे उत्तम लिखाणाचं प्रमाण हेच पडत असणार.

आजचं हे विभागीय आणि लवकरच भरणार असलेलं अखिल भारतीय ही दोन्ही साहित्य संमेलनं सुनामी लाटांच्या महाभीषण उत्पाताच्या पार्श्वभूमीवर भरत आहेत.



अनुक्रमणिका






त्या जलप्रलयाचा थेट फटका आपल्या महाराष्ट्राला बसला नाही, पण मानसिक धक्का मात्र बसला. महाराष्ट्र हा नैसर्गिक आपत्तींच्या संदर्भात इतर काही राज्यांच्या तुलनेत भाग्यवान म्हटला पाहिजे. भूकंपासारख्या आपत्ती महाराष्ट्रावर कोसळल्या, हे खरं, आणि त्यात झालेलं नुकसानही भरपूर हेही खरं; पण तामिळनाडू, ओरिसा, गुजरात, आंध्र इत्यादी राज्यांना दरवर्षीच बसणाऱ्या चक्रीवादळांच्या तडाख्यांच्या आणि आसाम, उत्तर प्रदेश, बिहार अशा राज्यांत दरवर्षीच येणाऱ्या महापुरांच्या तुलनेत सुसह्य! या परिस्थितीचा त्या त्या भाषांतील साहित्यावर काय परिणाम झाला असेल, आणि झाला असेल काय, असा प्रश्न माझ्या मनात येतो. त्या त्या भाषांतील साहित्यात दरवर्षीच्या नैसर्गिक आपत्तींमुळे मानवी जीवनावर होणाऱ्या आघातांचं चित्रण कशा स्वरूपात होत असेल? इतर भाषांचं ज्ञान मला नाही आणि त्या भाषांतील साहित्याचे मराठी अनुवादही अल्प प्रमाणात होत असतात, म्हणूनही याची कल्पना येत नाही. पण मराठीतली निसर्गकविता अजूनही जरुरीपेक्षा अधिकच रोमँटिक आहे. याचं कारण मानवी जीवनावर आघात करणाऱ्या नैसर्गिक आपत्तींचं कमी प्रमाण हे असेल काय, असा प्रश्न मला पडतो. दरसाल शेकडोच्या संख्येत लिहिल्या जाणाऱ्या पावसाच्या कविता बघा! मराठी कवितेत पाऊस अजूनही फारच रोमँटिक स्वरूपात पडत असतो! इतर राज्यांवर कोसळतात तशी महापूर, चक्रीवादळं यांची सततची संकटं महाराष्ट्रावर कोसळत असती, तर मराठीतील निसर्गविषयक कविता वेगळी झाली असती काय, असाही प्रश्न माझ्या मनात येतो. अर्थात मराठीतील निसर्गविषयक कवितेतील अतिरिक्त रोमँटिझम कमी व्हावा म्हणून महाराष्ट्रावर महापूर, चक्रीवादळ अशा आपत्ती कोसळाव्यात अशी मात्र माझी इच्छा नाही. कृपा करून तसा गैरसमज कोणी करून घेऊ नये. साहित्यिक आणि त्याच्या भोवतीचं वातावरण यांचं साहित्यिक नातं असतं आणि ते कसं असतं हे सूचित करण्यापुरतीच माझ्या वरील म्हणण्याची व्याप्ती आहे, हे कृपा करून लक्षात घ्या. नाहीतर मी भलत्याच संकटात सापडेन!

माझ्यापुरतं सांगायचं तर माझ्या भोवतीचं वातावरण जसजसं बदलत गेलं, जसजसा मी स्वतः बदलत गेलो तसतसं माझं लिखाण बदलत गेलं, त्याचे विषय बदलत गेले, त्यांच्याकडे बघण्याचा माझा दृष्टिकोनही बदलत गेला. बालपण आणि कुमार वय कोकणात गेल्याने तेथील जीवन मी माझ्या सुरुवातीच्या लिखाणात चित्रित केलं. मला जास्तीत जास्त परिचित असं जीवन होतं ते कोकणातील गरीब ब्राह्मण समाजाचं. तुटपुंज्या शेतीवाडीत कष्ट करणं, भिक्षुकीत दानदक्षिणा मिळवून संसार करणं यातच सारी हयात घालवणाऱ्या त्या समाजापाशी इतरांचं शोषण करण्याची कोणतीही सत्ता, शक्ती अथवा साधनसामग्री नव्हती. पुष्कळसं दयनीय, अगतिक आणि कोंडलेलं असं त्यांचं जीवन होतं. तेच मी चितारलं. माझं शिक्षण

नी पूर्ण केलं. उत्तम तऱ्हेचं यश परीक्षेत मिळवलं की नोकरी ठेवलेलीच आहे, असा आशावाद मी उराशी जपला होता. या आशावादाला जबरदस्त तडाखा बसला आणि मी भ्रमनिरासाचाही पहिला दाहक अनुभव घेतला. तो 'निष्पर्ण वृक्षावर भर दुपारी' सारख्या माझ्या लिखाणात उमटला. पुढं मी औद्योगिक जगतात प्रविष्ट झालो. नियतकालिकांचा व्यवसाय आणि म्हणून पत्रकारिता हाही औद्यौगिक जगताचाच एक भाग होता. जीवनाचर्या या टप्प्यावर मी कारखान्यांच्या आणि औद्योगिक आस्थापनांच्या परिसरातील मनुष्यजीवनाचा अनुभव घेतला. संप, टाळेबंदी, कामगार आंदोलनं, नव्या तंत्रज्ञानाचं आगमन आणि त्याचा कारखान्यातील उत्पादनावर होणारा, तसंच कामगारांच्या जीवनावर होणारा थेट परिणाम अनुभवला. मार्क्सवादाच्या प्रभावामुळे उराशी कवटाळलेली औद्योगिक जगाविषयीची काही गृहितकं कोसळून पडताना बघितली. ही सगळी उलथापालथ मानवी अनुभवांच्या चित्रणाद्वारे कथा-कादंबऱ्यांत पकडण्याचा मी प्रयत्न केला. या वाटचालीत मी श्रमिक पत्रकारापासून मुख्य संपादकपदापर्यंत चढत गेलो. 'मॅनेजमेंट लॅडर'वर खूप वरच्या पायरीवर पोचल्यावर आजूबाजूच्या वातावरणाशी असलेलं माझं नातं बदललं. त्याचेही खूप ताणतणाव अनुभवले. तेही मी माझ्या लिखाणातून चितारले.

औद्योगिक आस्थापनांच्या परिसरातील मनुष्यजीवन चितारताना माझ्या मनाशी असलेलं आकलनाचं सूत्र होतं ते शोषणाचंच!

गेल्या चाळीसेक वर्षांत मराठीत लिहिलं गेलेलं पुष्कळसं साहित्य या शोषणाच्या सूत्राभोवतीच गुंफलेलं आहे. अनेक पातळ्यांवरचं आणि अनेक प्रकारचं शोषण. वर्णव्यवस्थेनं दलितांचं केलेलं शोषण; पुरुषप्रधान समाजरचनेत स्त्रीचं झालेलं शोषण; मालकवर्गाने मजुरांचं केलेलं शोषण; नागरी संस्कृतीने ग्राम संस्कृतीचं केलेलं शोषण; धर्मानं केलेलं सामान्य माणसाचं शोषण; राज्यकर्त्यांनी केलेलं जनतेचं शोषण; धनिक वर्गानं केलेलं निर्धनांचं शोषण; व्यापारी वर्गाने केलेलं शेतकऱ्यांचं शोषण अशी अनेक प्रकारांची आणि अनेक पातळ्यांवर कार्यरत असणारी शोषणव्यवस्था दाखवीत त्या व्यवस्थेत होणारं माणसांचं शोषण चितारणं हीच गेल्या चाळीसेक वर्षांतील मराठी साहित्यनिर्मितीमागची मुख्य प्रेरक शक्ती राहिलेली आहे. म्हणूनच एखादी राजकीय कादंबरी असो की ग्रामीण कादंबरी असो, तीत हे शोषणचक्रच चित्रित झालेलं असणार असा अंदाज ती कादंबरी न वाचताही बांधता येतो. हा अंदाज सहसा चुकत नाही.

'बालकाण्ड' लिहायला घेण्यापूर्वी माझ्या मनानं बहुधा एक निर्णय केला होता की, माझ्या बालपणाची ही हकीकत सांगताना ती शोषणाच्या प्रस्थापित सूत्राभोवती गुंफायची नाही. कारण, या एकाच सूत्रानं तिचं आकलन करणं कठीण आहे. ती जशी घडत गेली तशीच ती सांगितली पाहिजे. कोणतीही पूर्वसिद्ध अशी वैचारिक



अनुक्रमणिका






भूमिका तिच्यावर लादता कामा नये. मी ती हकीकत तशी सांगत गेलो. त्यातून एक उत्तम दर्जाची साहित्यकृती निर्माण झाल्याचं जाणत्या साहित्य समीक्षकांनी अगदी मनमोकळेपणानं सांगितलं. समकालीनत्वाच्या पलीकडचं सार्वकालीनत्व साहित्यकृतीनं पकडलं पाहिजे, ते थोडं तरी साध्य झालं असंही मला वाटलं. जर शोषणाच्या सूत्राभोवतीच माझ्या बालपणीची हकीकत मी गुंफली असती तर कदाचित तिची ध्वन्यर्थक्षमता कमी झाली असती.

अनेक प्रकारच्या व अनेक पातळ्यांवरच्या शोषणव्यवस्थेचं चित्रण हा एकच एक दृष्टिकोन गेल्या चाळीस वर्षांतील मराठी ललित साहित्याने आपणावल्यामुळे त्याच त्याच आशयाची आवर्तनं मराठी साहित्यात होऊ लागली आहेत की काय अशी शंका येते.

सध्या मराठी भाषेचं 'बुक मार्केट' अतिशय तेजीत असल्याचं दिसतं. पुस्तकाचा खप वाढविण्यासाठी विक्रेते आणि प्रकाशक मार्केटिंगची नवनवी तंत्रं अमलात आणत आहेत. साहित्य संमेलनं, प्रदर्शनं, स्पर्धा, ग्रंथयात्रा, विविध पुरस्कार यांनी मराठी ग्रंथजगत गजबजून गेलं आहे. कोट्यवधी रुपयांची पुस्तकविक्री होत आहे. पण हा खप कथा, कविता, कादंबरी अशा प्रकारातील ललित साहित्याचा नसून ललितेतर पुस्तकांचा आहे. या पुस्तकांना 'युटिलिटी बुक्स' असं म्हणण्याऐवजी मी त्यांना 'जीवनविद्येची पुस्तकं' म्हणतो. आरोग्य, आहार, सौंदर्यसाधना, व्यवस्थापन, यशःप्राप्ती, अध्यात्म, परदेशगमन, धनवृद्धी, पर्यटन, समाजजीवन, इतिहास, संस्कृती अशा अनेक विषयांवरची पुस्तकं जीवनविद्या शिकवतात. या प्रकारच्या पुस्तकांचाच हा खप आहे. म्हणूनच मला वाटतं की मराठी साहित्याचा सध्याचा कालखंड हा ललितेतर ग्रंथांच्या (नॉनफिक्शन) प्रभावाचा कालखंड आहे.

म्हणूनच माझ्यासारख्या कादंबरीलेखकाला वाटतं की हा आव्हानाचाही कालखंड आहे. वाचक कमी झाल्याने आणि त्यामुळे खपही कमी झाल्याने प्रकाशक कादंबऱ्यांची, कथांची पुस्तकं छापायला फारसे उत्सुक नाहीत. कादंबऱ्या लिहून चरितार्थ चालवणं तर अशक्यच झालं आहे. एक प्रकारे, द्रव्यप्राप्तीसाठी कादंबरीलेखन या मोहातूनही कादंबरीकारांची सुटका झाली आहे. आता कादंबरी लिहायला घ्यायचीच झाली तर ती साहित्यिक निर्मितीचं आव्हान म्हणून! कादंबरी लेखनामधील सर्जनशीलतेचं आव्हान म्हणून!

माझं हे छोटंसं भाषण ऐकून घेतल्याबद्दल धन्यवाद!

**ह. मो. मराठे**

४, रामकृष्ण अपार्टमेंट, मीरा सोसायटीमागे, आनंद सोसायटीसमोर,
शंकरशेट रोड, पुणे ४११०३७, फोन : २६४३४६४५

❑

# अरुण कोलटकरांची 'जेजुरी' : जीवनातील चिरंतन चैतन्यतत्त्वाचा शोध



प्राचार्य डॉ. अ. पां. दाणी

अरुण कोलटकर (१९३२-२००४) आणि दिलीप पुरुषोत्तम चित्रे ह्या दोन्ही कवींनी मराठी आणि इंग्लिश कवितेमध्ये प्रायोगिक नवतेच्या आविष्कारात बा. सी. मर्ढेकर आणि पु. शि. रेगे ह्यांच्या काव्यलेखनाशी दृढ नाते जोडलेले आहे. अर्थात द्वैभाषिक कवी असल्याने पाश्चात्त्य आधुनिक कवींच्या काव्याचा आशय आणि शैलींचा प्रभावही त्यांच्यावर आहे. इलियट, पाउण्ड, रॅम्बो, बोदलेर आणि अतिवास्तववादी कवींची गणना त्यांच्या वरील परिणामप्रभुत्वामध्ये आहे. आधुनिक मराठी कवींचा आत्मशोध हा त्यांच्या व्यक्तित्वाच्या व्यामिश्र दुभंगातून (Schizophrenia) उगम पावला आहे, असे चित्रे ह्यांनी रेग्यांच्या कवितेची समीक्षा करताना म्हटले आहे. अपरंपरावाद, परात्मवाद, परस्परसंबंधांचा अभाव ह्या व्यवच्छेदक लक्षणांचा उद्‌गम ह्या कवींमध्ये दिसतो तो पारंपरिक आणि आधुनिक संस्कृतिबंध, संवेदना आणि संकल्पना ह्यांच्या तीव्र संघर्षामुळे. तर्काधिष्ठित संप्रेषण, भावनात्मक अनुभव ह्यांच्या आविष्कारापेक्षा अतार्किक, अस्वाभाविक, अवास्तव यांच्या अभिव्यक्तीसाठी सर्वसामान्य भाषेतून वैचित्र्यपूर्ण आकृतिबंध निर्माण करून प्रचलित काव्यबंधांना छेद देऊन अलौकिक अनुभव काव्यबद्ध करणे, हे ह्या कवींचे वैशिष्ट्य असल्यामुळे दुर्बोधता, चमत्कृती त्यांच्या काव्यात प्रकर्षाने दिसते. विसंवादी जगाच्या व्यामिश्र पसाऱ्यातून चिरंतन वास्तवाचा संवादी आविष्कार करण्याचा ह्या अतिवास्तववादी (Surrealist) कवींचा जाणीवपूर्वक प्रयत्न असतो. अरुण कोलटकर आपल्या कवितांमधून ही वैशिष्ट्ये व्यक्त करतात.

कोलटकरांची 'जेजुरी' ही छत्तीस भागांची दीर्घ कविता इंग्लिशमध्ये १९७४ मध्ये प्रथम प्रसिद्ध झाली. तिला १९७७ मध्ये कॉमनवेल्थ कविता पुरस्कार (भारतीय आधुनिक वाङ्मयांतर्गत) लाभला. तिची पाचवी आवृत्ती २००१ मध्ये प्रसिद्ध झाली. ह्या प्रथितयश कवितेवर समर्थनपर व निंदाव्यंजक असे बरेच समीक्षालेखन झाले आहे. भालचंद्र नेमाड्यांनी असे म्हटले आहे की, कोलटकरांसारख्या अश्रद्ध संशयात्म्यास वाटणारी जेजुरीच्या पाषाणखंडातील ऱ्हास पावलेली व मृतप्राय आहे, असे प्रतीत होणारी पुरातन संस्कृतीची












मिथके अजूनही चैतन्यमय आहेत. पण ब्रूस किंग ह्या पाश्चात्त्य समीक्षकाचे असे मत आहे की, 'जेजुरी' हा अश्रद्ध मनाचा आविष्कार नसून किंवा आधुनिक श्रद्धाहीन आणि अपकर्ष पावलेल्या समाजस्थितीची अभिव्यक्ती नसून, जीवनातील नैसर्गिक चैतन्यमय सत्‌तत्त्वाचा साक्षात्कार– हीनतेशी असलेल्या संघर्षाचे चित्रण आहे. 'जेजुरी' ह्या दीर्घ काव्यगुच्छाची पार्श्वभूमी म्हणजे कोलटकरांनी आपले कनिष्ठ बंधू मकरंद आणि मित्र मनोहर ओक यांच्याबरोबर जेजुरीत बसने केलेले आगमन, जेजुरी परिसरातील देवता व स्थळे ह्यांना दिलेल्या भेटी, आणि जेजुरी रेल्वे स्टेशनवर झालेल्या परतीच्या प्रवासाचे प्रस्थान, असा तथाकथित यात्राप्रवास आहे. कोलटकरांची अश्रद्धता तसेच परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल किंवा नास्तित्वाबद्दल साशंकता ह्या कवितेच्या प्रवक्त्यामध्ये प्रकर्षाने प्रकट झाली आहे. पारंपरिक धर्मश्रद्धेचा अभाव असलेल्या ह्या प्रवक्त्याने चित्रकाव्याच्या शैलीने वर्णिलेल्या देवता, देवस्थाने, वास्तुखंड, व्यक्ती, पहाडी परिसर आणि निसर्ग ह्यांचा आविष्कार बुद्धिवादी आणि बहुधा परात्मवादी दृष्टिकोनातून केलेला दिसतो. जेजुरी परिसराची अस्वच्छ, दयनीय स्थिती, भाविकांचे पुजाऱ्यांकडून शोषण आणि भ्रष्टता यांच्या अतिवास्तववादी आणि उपहासगर्भ चित्रणाचा त्यात समावेश आहे. कडे- पठारातील पुरातन भग्न देवालय समूहाची 'Heart of Ruin' मध्ये वर्णिलेली अवस्था अशी आहे :

*"The roof comes down on Maruti's Head*
*Nobody seems to mind,*
*Least of all Maruti himself.*
*May be, he likes a temple better this way."*

भिक्षा मागणाऱ्या दयनीय वृद्ध स्त्रीचा सुरकुतलेला चेहरा पाहताच कवीच्या अतिवास्तववादी प्रतिमेचा आविष्कार असा होतो :

*"And as you look on*
*the cracks that begin around her eyes*
*spread beyond her skin.*
*And the hills crack.*
*And the temples crack.*
*And the sky falls."*

येथे भग्नता व विनाश हा मानव, स्थल, काल ह्यांना व्यापणारा आहे, ह्याचे परिणामकारक अतिवास्तववादी चित्रण झालेले आहे. जेजुरी गडावरील खंडोबा, म्हाळसा, नंदी, बगड, बाणाई, यशवंतराव, वाघ्यामुरळी, अजामिळ आणि वाघ्याच्या जन्मकथेचे मिथक ह्या सर्वांचे वर्णन कवीच्या अश्रद्ध दृष्टिकोनातून झालेले आहे. यशवंतराव हा द्वितीय

श्रेणीचा देव आहे आणि त्याची जागा मुख्य देवालयाच्या बाहेर भिंतीवर आहे. प्रवक्त्याचा छद्मीपणा त्याच्या उल्लेखात असा दिसतो :

*"Are you looking for a god?*
*I knew a good one.*
*His name is Yeshwant Rao*
*and he is one of the best."*

यशवंतराव भक्तांचे अपंगत्व नष्ट करणारा आहे, पण त्याला स्वत:ला हात, पाय आणि मस्तक नाही. त्याचा औपरोधिक उल्लेख असा आहे :

*"He is merely a kind of bonesetter*
*The only thing is,*
*as he himself has no heads, hands and feet,*
*he happens to understand you a little better."*

परंतु ह्या मृतप्राय भग्न छिन्न परिसराला व्यापणारे चिरंतन चैतन्यतत्त्व आहे ते झाडोरा, झुडपे, प्राणिमात्र, फुलपाखरे ह्यांच्या स्वरूपात.

'चैतन्य' कविता समूहाचा संदर्भ चैतन्य महाप्रभूंच्या (इ. स. १५१० च्या सुमारास) जेजुरीभेटीशी आहे. चैतन्य महाप्रभूंनी केलेले परिसरस्तवन आणि धार्मिक अंधश्रद्धांचे केलेले भंजन परिणामकारक ठरले नाही ह्याची खंत कवी व्यक्त करतो. 'चैतन्य' शब्द द्व्यर्थी आहे. चिरंतनतत्त्वाकडे तो लक्ष वेधतो.

*"the hills remained still*
*when chaitanya*
*was passing by*
*a cowbell tinkled*
*when he disappeared from view."*

चिरंतनतत्त्वाचा उत्स्फूर्त जीवनसातत्याचा आविष्कार कवीला दिसतो तो जेजुरी परिसर आणि रेल्वे स्थानक ह्यांच्यामध्ये दिसलेल्या कुक्कुट नृत्याच्या जोशपूर्ण आविष्कारात.

"... of a dozen cocks and hens in a field of jowar in a kind of harvest dance. The craziest you've ever seen."

रेल्वे स्थानकावरील इंडिकेटर, फलाटावरचा कुत्रा, चहाचे दुकान, स्टेशन मास्तर, बुकिंग क्लार्क, आणि रेल्वे रुळांच्या अनंतात मिळणाऱ्या रेषांवरील क्षितिजावर दिसणारा चक्राकार मावळता सूर्य ह्यांच्या दृक् चित्रणात पुनश्च जेजुरी परिसरात वास्तव्य करण्याच्या

धर्मश्रद्धांच्या व धर्मकार्याच्या प्रतिमांचा उपरोधगर्भ पुन:प्रत्यय परिणामकारक आहे. स्टेशनमास्तर कवीला असा दिसतो :

*"the two headed station master*
*belongs to a sect*
*that rejects every time table"*

मानवी नेत्राला दिसलेले ऐंद्रिय विश्व हे सूचित केले आहे शेवटच्या कवितेने–

*"... Where the rails*
*Like the parallels*
*of a prophecy*
*appear to meet*
*the setting sun*
*large as a wheel"*

ऐंद्रिय विश्वातील वस्तुमात्रांचे निरीक्षण आणि साध्या घटनेत, सचेतनात आणि अचेतनात कविमनाला आढळणारा मोठा आशय, व त्यांचे विस्मयकारक दृश्य अपूर्व परिवर्तन ह्यातच चैतन्यरूप परमेश्वराचे दर्शन होते, असे कोलटकरांना सुचवायचे आहे.

**प्राचार्य डॉ. अ. पां. दाणी (सेवानिवृत्त)**
(फर्गसन महाविद्यालय, पुणे ४११००४)
प्लॉट क्र. १४, युनायटेड वेस्टर्न सोसायटी
कर्वेनगर, पुणे ४११०५२, दूरध्वनी (०२०) २५४४५५१६

---

## साभार पोच

**चांदणे उन्हातले :** संगीता जोशी, स्नेहल प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९६
**पेच पर्व :** दया सागर बठते, सुयश प्रकाशन, सांगवी, पृष्ठ ६०
**टाहो :** इंद्रजित भालेराव, प्रतिमा प्रकाशन, परभणी, पृष्ठ ८०
**अर्थाय :** गो. य. मालोदे, काव्यपत्रिका प्रकाशन, नागपूर, पृष्ठ २६
**आधुनिक सुभाषिते :** गो. य. मालोदे, काव्यपत्रिका प्रकाशन, नागपूर, पृष्ठ २४
**पुष्पाविण कल्पतरू :** दत्ता वाळवेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ १५६
**क्षात्र बोली :** दत्ता वाळवेकर, सहस्रार्जुन प्रकाशन, नासिक रोड, पृष्ठ ३१८
**करामती प्रकाश (संस्कार कथामाला भाग १) :** विजय नांगरे, संज्योत प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ६०

# अनुवादक हा संशोधक - अभ्यासक हवा
## (साहित्य-अकादमी पुरस्कार विजेत्या डॉ. मृणालिनी गडकरी यांची मुलाखत)



**प्रा. सुजाता शेणई** (मुलाखतकार)

---

साहित्य अकादमीचा २००४ चा अनुवादासाठीचा पुरस्कार डॉ. मृणालिनी गडकरी यांच्या 'देवदास' या कादंबरीला जाहीर झाला. अनुवाद हे आपले कार्यक्षेत्र ठरवून परिश्रमपूर्वक गेली दहा वर्षे सातत्याने अनुवादाचे काम डॉ. मृणालिनी गडकरी करत आहेत. तसलिमा नसरीन, ओशो, शरदचंद्र चट्टोपाध्याय, शीर्षेंदु मुखोपाध्याय, सुस्मिता बॅनर्जी, बाणी बसू, रवींद्रनाथ टागोर या बंगाली लेखकांच्या साहित्यकृतींचे त्यांनी अनुवाद केले आहेत. अनुवादाची निर्मितिप्रक्रिया आणि त्यातील सर्जनशीलता यासंबंधी त्यांची काही मते आहेत. या निमित्ताने त्यांच्याशी साधलेला एक मुक्तसंवाद.

**प्रश्न :** 'देवदास' या कादंबरीची लोकप्रियता अजूनही टिकून आहे, त्या देवदासबद्दल काय वाटतं?

**उत्तर :** देवदास ही शरदचंद्र चट्टोपाध्याय यांची विसाव्या शतकाच्या प्रारंभी लिहिलेली कादंबरी आहे. यातील व्यक्तिरेखा माणुसकी, प्रेम, त्याग अशा अत्युत्तम गुणांचं दर्शन घडवतात. माणसाच्या मनातील गुंतागुंत, संघर्ष परिणामकारक रेखाटतात. बंगाली संस्कृती, विसाव्या शतकाच्या आरंभीचा समाज, उच्च-नीचतेच्या कल्पना, जातिभेद, आधुनिक विचारांचा शहरातून वाहू लागलेला प्रवाह याचे परिणामकारक चित्रण या कादंबरीत आले आहे. शरदबाबूंना बंगालमध्ये जनसाधारणांचे लेखक म्हणून ओळखतात. त्यांच्या कोणत्याही साहित्यकृतीचं अनुवादाचं काम करणं म्हणजे आव्हान असतं. शरदबाबूंचे साहित्य देशातीत आणि कालातीत आहे म्हणूनच असेल, पण 'देवदास' ची लोकप्रियता अजून टिकून आहे.

**प्रश्न :** अनुवाद करणे म्हणजे शब्दश: भाषांतर करणे नाही, तर अनुवाद म्हणजे भावानुवाद असतो. तो भावानुवाद कसा करता?

**उत्तर :** अनुवादाच्या शब्दश: अनुवाद आणि स्वैर रूपांतर या दोन टोकाच्या भूमिका आहेत. अनुवाद हा मूळ साहित्यकृतीशी प्रामाणिक राहून केलेला असावा. मूळ साहित्यकृती वाचून जो परिणाम त्या भाषेतील वाचकांवर होईल तोच परिणाम अनुवाद वाचणाऱ्या वाचकांवर व्हायला पाहिजे. मूळ साहित्यकृतीतील आशय कमीत कमी गळेल असा मी प्रयत्न करते. अनुवाद करणे म्हणजे दुसरी संस्कृती आपल्या भाषेत आणणे. ही संस्कृती त्यातील गुणवैशिष्ट्यांसह व मर्यादांसह आपल्या भाषेत आणणं म्हणजे भावानुवाद असं



अनुक्रमणिका






माझं मत आहे. अनुवादकाने मूळ साहित्यकृती आणि अनुवादित होत असलेली साहित्यकृती यांच्याशी बांधीलकी स्वीकारलेली असते. ही बांधीलकी पारदर्शी झाली तर तो भावानुवाद चांगला झाला असं समजावं.

**प्रश्न :** अनुवादकाला अनुवाद करण्यासाठी कोणती पूर्वतयारी करावी लागते?

**उत्तर :** अनुवादक हा प्रथम दर्जाचा वाचक असावा लागतो. उत्तम वाचक झाल्यावर ती साहित्यकृती संपूर्णपणे अनुवादकामध्ये भिनते. अनुवादक मूळ लेखकाच्या मनात शिरून त्याला काय सांगायचंय हे समजून घेतो. लेखकाशी सह-अनुभूती घेतो. साहित्यकृतीशी समरस होतो, पण तरीही भाषा, शैली, विचार या बाबतीत अलिप्त रहातो.

अनुवादक हा अभ्यासक आणि संशोधक अशा दोन्ही पातळ्यांवर काम करत असतो. अनुवादकाला ज्या भाषेतून अनुवाद करायचा आहे आणि ज्या साहित्यकृतीचा अनुवाद करायचा आहे, त्या काळातील, त्या प्रदेशातील ऐतिहासिक, सामाजिक, साहित्यिक, सांस्कृतिक, भौगोलिक अशी सर्वांगीण माहिती हवी. परभाषेची लकब, खाचाखोच, लेखकाची शैली आत्मसात करायला हवी. दोन भिन्न संस्कृतीतले साधर्म्य आणि विविधता, भाषेतील सौंदर्यस्थळे, वाचकांची अभिरुची, आशय आणि अभिव्यक्तीची मांडणी यांचा अभ्यास करून अनुवादक अनुवाद करत असतो. अनुवादकालाही विशिष्ट प्रतिभेची गरज असतेच, म्हणून अनुवादाला मी स्वतंत्र साहित्यकृती मानते. अशा स्वतंत्र साहित्यकृतीची निर्मिती करताना काही अडचणी येतात, कारण भाषेच्या लकबी आणि संस्कृती यांत फरक असतो. एका भाषेतील वाकप्रचार, म्हणी किंवा लोकवाङ्मयातील भाग हा दुसऱ्या भाषेत तसाच्या तसा वापरता येत नाही. उदाहरणार्थ बंगालीत सत्कार म्हणजे अंत्यसंस्कार, तर मराठीत सन्मान, कौतुक असा आहे. ही काळजी अनुवादकाला खूप घ्यावी लागते. त्या दृष्टीने अनुवाद हे खूप कष्टाचे, अभ्यासाचे काम आहे.

**प्रश्न :** स्वतंत्र साहित्यकृतींची निर्मिती भरपूर होत असताना अनुवादाचं महत्त्व काय आहे?

**उत्तर :** अनुवादाची परंपरा फार मोठी आहे. जगात अनेक भाषा बोलल्या जातात. किमान दोन भाषा जाणणारे अभ्यासक आणि प्रतिभावंतही आहेत जे साहित्यकृतींच्या प्रेमापोटी त्याचे चांगले अनुवादही करतात. त्यामुळे अनुवादाची ही परंपरा अशी पुढे चालू राहणार.

अनुवाद हा वाचकांना समृद्ध करत असतो. रामायण, महाभारत, बायबल, कुराण, बौद्धग्रंथ, जुनी महाकाव्ये आपल्यापर्यंत अनुवादातून पोचली आहेत. अनुवाद वाचकांचे विचारक्षेत्र विस्तृत करत असतात. ज्ञानात भर घालत असतात. साहित्यकृती वाचल्यानंतर वाचकाला आनंद मिळायला हवा, ज्याची जबाबदारी अर्थात अनुवादकाने घ्यायला हवी. साहित्याने माणूस घडतो, संस्कारशील होतो, त्यामुळे अनुवादित साहित्यही वाचकाला समृद्ध करते म्हणून अनुवादाला सध्याच्या जगात फार महत्त्व आहे. सध्याच्या तांत्रिक दृष्ट्या विकसित साधनांमुळे जग जवळ येत आहे. विचारविनिमय शक्य आहे, अनुवादामुळे विचारमंथनालाही चालना मिळेल.

**प्रश्न :** बंगाली साहित्य व मराठी साहित्य हा तुमच्या एम. फिल आणि पीएच. डी. चा अभ्यास विषय आहे. बंगाली साहित्यकृतींचे तुम्ही अनुवाद करता, तर बंगाली साहित्य आणि मराठी साहित्य यांतील फरक काय जाणवतो?

**उत्तर :** बंगाली साहित्यात कथा-कादंबऱ्यांची विविधता खूप आढळते. बंगाली लेखकाला ज्या विषयावर लेखन करायचं आहे त्या विषयाचा तो लेखक अनेक वर्षं अभ्यास करतो आणि मग लिहितो. मराठीतही असे लेखक आहेत, पण प्रमाण कमी आहे. बंगालमधल्या प्रथितयश लेखिका बाणी बसू यांच्या 'गांधर्वी' ह्या कादंबरीत अभिजात संगीत केंद्रस्थानी आहे. त्यांच्याच 'मैत्रयजातक' ह्या कादंबरीत बुद्धाचा काळ वर्णन केलाय. या कादंबऱ्या जरूर वाचायला हव्यात. अशा साहित्यकृती बंगाली साहित्यात आहेत ज्यांचा अनुवाद आवर्जून करावासा वाटतो.

**प्रश्न :** तुमच्या अनुवादित पुस्तकांना तुम्ही प्रस्तावना लिहिता. त्यामागे हेतू कोणता असतो?

**उत्तर :** अनुवादाला पूरक अशी आवश्यक ती माहिती द्यायला हवी म्हणून प्रस्तावना लिहिते. उदाहरणार्थ : सुस्मिता बॅनर्जी ह्यांच्या 'काबुलीवालार बंगाली बउ' ह्या बंगाली पुस्तकाचा 'काबुलीवाल्याची बंगाली बायको' ह्या नावानं मराठीत अनुवाद केला. सुस्मिता बॅनर्जीनी पुश्तू किंवा अफगाणिस्तानातील स्थानिक भाषेतील शब्द आणि कुराणातील सुरा ह्या बंगालीत लिहिल्या. अनुवादात ते शब्द व सुरा बंगालीप्रमाणेच लिहिल्या.

**प्रश्न :** कथा, कविता, कादंबरी, नाटक यांची समीक्षा केली जाते. अनुवादित साहित्याची समीक्षा केली जाते का व ती कशी असावी असे तुम्हांला वाटते?

**उत्तर :** अनुवादित साहित्याची समीक्षा करायला स्वतंत्र पद्धतीची समीक्षा हवी. समीक्षकाला दोन्ही भाषांचे ज्ञान व साहित्याची जाण हवी. अनुवादकाच्याही काही चुका लेखनात होत असतात. चांगली समीक्षा झाली तर अनुवादकाची जबाबदारी वाढेल तसेच उत्साहही वाढेल. अनुवादित कलाकृतींची दखल घेतली जाते, असा विश्वास निर्माण झाला तर नवीन लेखक अनुवादाकडे वळतील. अनुवादाकडे बघण्याचा दृष्टिकोनही बदलेल.

डॉ. मृणालिनी गडकरींना मिळालेला हा साहित्य अकादमीचा पुरस्कार ही त्यांच्या दृष्टीने झालेली सुरुवात आहे. सुनील गंगोपाध्याय, बाणी बसू, शरदचंद्र चट्टोपाध्याय, रवींद्रनाथ टागोर, माणिक बंद्योपाध्याय यांच्या साहित्यकृतींचे त्यांना अनुवाद करायचे आहेत. अनुवाद हा आपला पिंड असून त्या कार्यक्षेत्राशी समरसून काम करणाऱ्या मृणालिनीताईंना पुढील वाटचालीसाठी शुभेच्छा!

**डॉ. मृणालिनी गडकरी**
८-अ, कांचनबन अपार्टमेंटस्,
सेनापती बापट मार्ग, पुणे-१६
दूरध्वनी २५६५८३०६

**प्रा. सुजाता शेणई**
ए-१, सुंदर रचना,
विठ्ठलनगर, वडगाव बुद्रूक, पुणे-५१
दूरध्वनी : २४३४९४६६

*(डॉ. मृणालिनी गडकरी यांच्या आकाशवाणीसाठी घेतलेल्या मुलाखतीचा काही अंश)*



अनुक्रमणिका

# आत्मनिवेदनातून साकारलेलं भावकाव्य : 'जगाला प्रेम अर्पावे'
## (कवी. ना. धों. महानोर)



डॉ. किसन पाटील

जन्मभूमी कोकण परंतु कर्मभूमी खानदेश! वृत्ती संताची आणि ध्यास शिक्षणाचा! उक्ती सत्यशिवसुंदराची आणि कृती देशभक्तीची! अशा जगाला प्रेम अर्पण करणाऱ्या पू. साने गुरुजींच्या जीवनावरील दीर्घ भावकविता ना. धों. महानोर यांनी नुकतीच प्रकाशित करून आपल्या हृदयीच्या भावनांचाच आविष्कार घडवला आहे. या पुस्तकाचे शीर्षक 'जगाला प्रेम अर्पावे' हे सानेगुरुजींच्या 'खरा तो एकचि धर्म' या कवितेतील प्रेमधर्माची शिकवण देणारे असेच आहे. या शीर्षकातून सानेगुरुजींच्या व्यक्तिमत्त्वाची 'शब्दप्रतिमा' अचूक व नेमकेपणानं स्वीकारली आहे. मानवतावादी दृष्टिकोनातून जन्मदात्री माता, भारतमाता आणि विश्वमाता अशा मातृत्रयींच्या प्रेमाचा अंगिकार करणाऱ्या प्रेमधर्मी सानेगुरुजीचं व्यक्तिमत्त्व काव्यमय भावातून व्यक्त करण्याचा कवी महानोर यांचा हा आगळावेगळा प्रयत्न आहे.

या दीर्घ कवितेतून २५ भागांमध्ये सानेगुरुजींच्या जीवनाची काव्यमय व उत्कट भावपूर्ण अभिव्यक्ती ना. धों. महानोर करतात. या दीर्घकवितेतून अथांग निळाईत दूर गेलेले आकाश, कोकणचं निसर्गसुंदर वर्णन, झुळझुळ झऱ्यांचे रस्ते, निळाभोर समुद्र, सुंदर तांबडीलाल भुई, कौलारू घर, तुळशी-वृंदावन, तेजोमय आईचं घर, प्रार्थनेत देवरूप झालेलं घर असा कोकणच्या परिसराचा आणि सानेगुरुजींच्या जन्मभूमीचा आलेख निसर्गरम्य व तितकाच भावपूर्ण व्यक्त होतो. लहानपणीचा पांडुरंग सदाशिव साने, श्यामच्या आईतील मानसपुत्र 'श्याम' रूपानं आत्मनिष्ठ ललित शैलीत जसा व्यक्त झाला त्याचा अनुबंध नेमक्या व मोजक्या अल्पाक्षरात या कवितेतून प्रकट होतो.

शिक्षणाच्या ओढीनं पुण्यात आलेला पांडुरंग इथल्या गजबजाटानं आणि हवेल्या-माड्यांकडे पाहून जरा हबकून जातो. परंतु विद्येच्या घरात, ज्ञानाच्या घरात, विद्वानांच्या शहरात, समृद्ध ग्रंथांच्या सान्निध्यात खूप लिहावं, वाचावं, नवं शिकावं यासाठी धडपडत असतो. पुण्याचं त्यांचं नातं कवी पुढील शब्दात मांडून जातो :

*जोडून घेतलं नातं, जिवाभावाचं, ऋणानुबंधाचं*
*या पुण्यवंत नगरीशी,*

*इथल्या विद्या भवनाशी*
*फुलपाखरासारखं वेचण्यात गेलेले सुंदर दिवस* (पृ. ३)

या कवितेतून जणू सानेगुरुजी हा सर्व भावबंध निवेदन करत आपल्या मनातील आंदोलनं मांडत जातात असं निवेदनशैलीतलं हे आत्मनिष्ठ कथन होत जातं. पुण्यातून खानदेशाकडे आकर्षित झालेलं मन, खेड्याची ओढ, शिक्षणाची तळमळ, सामान्य माणसामध्ये जाऊन राहायची, नवं नातं जोडायची गुरुजींची ओढ पुढील ओळींतून व्यक्त होते :

*लहान लहान मुलांमध्ये, लहान लहान शाळांमध्ये*
*जाऊन राहायचं*
*आपलं गणगोत समजून नवं नातं जोडून*
*थेट खेड्यामध्ये जाऊन राहायचं*
*तापीच्या किनारी शांत निर्मळ प्रवाहाच्या किनारी*
*गजबज नसलेल्या खेड्यामध्ये जायचं* (पृ. ४)

आपल्या आईचा संस्कारमेवा, तिनं शिकवलेलं तत्त्वज्ञान, अंगाई गीताची लय, गरिबीतून दिडकी दिडकी जमवून शिकायचा संस्कार, आपलं माया प्रेम, याची सर्वांना द्यायची शिकवण, माणुसकीचं, माया-ममतेचं शिक्षण साऱ्या जगाला मूठमूठ वाटण्याची प्रतिज्ञा, जग सुंदर करायचं, धडपडत जगायचं ह्या साऱ्या आईच्या प्रेरणांची शिदोरी व्यक्त करणारं तरल भावपूर्ण मन व्यक्त होतं. अकालीच आईचं निधन झाल्यानं दाटून येणारे अश्रू थांबत नाहीत. त्याचं चित्रच दृकपटलावर उभं राहातं–

*आई, तू थोडं आणखी*
*थांबायला हवं होतंस*
*आई, अश्रूंचे ओघळ घळघळा*
*डोळ्यांना सोडत नाही ग आई* (पृ. ६)

यानंतर सानेगुरुजींच्या निवेदनातून त्यांची 'अश्रू' नावाची कविता सादर केली जाते. अश्रूमाहात्म्याचं मंगलमय दर्शन त्यातून घडते. करुणता आणि भावमयतेचा तो सर्वांगसुंदर आविष्कार गुरुजींच्या आत्मनिवेदनातून कवितेचं हृदयाचं नातं सांगून जातो.

खानदेशचा परिसर, त्याची समृद्धी, अमळनेरचं वास्तव्य, तत्त्वज्ञान केंद्र, छात्रालय, शाळा, शेजारची रेल्वेलाईन बडोदा - अहमदाबाकडे - गांधीजींकडे निघालेली, या परिसरातील आठवणीतून शिक्षणाची ओढ असलेल्यांना शिकवण्याचा मनोदय व्यक्त होतो. त्यांना भरवायचं, त्यांची आई व्हायचं, त्यांच्या अश्रूंना डोळे देऊन दुःख वाटून घ्यायचं... शिक्षणाचा शब्द देऊ... आई होऊन पांघर देऊ... आपण त्यांची आई होऊ. (पृ. ९) असा जिव्हाळ्याचा व सर्व काही मुलांना देण्याचा मनोदय हाच या भावकाव्याचा प्रांजळ व सुसंस्कारित 'आत्मा' म्हणून प्रकटत जातो. मुलाची आई होऊन छात्रालयात राहताना











बालपणीच्या स्मृती दाटून येतात.. "स्वप्नात बिचकून उठून बसतो." या शब्दातून सानेगुरुजींच्या आंतरिक भावभावनांचा व वेदनेचा कारुण्यमय आविष्कार घडतो.

खानदेशातील आदिवासी, सातपुड्याचा परिसर, लहान लहान खेडी, धाबल्यांची मातीची घरं, काळ्या मातीतून सोन्याचा कोंभ रुजवणारे बलवंत शेतकरी यांच्या घरापर्यंत ज्ञानाचा दिवा घेऊन जाण्याची वृत्ती, खेड्यात वसणाऱ्या या देशाला समृद्ध केलं पाहिजे. त्यासाठी पाण्याचे पाट बांधाबांधावर उभारले पाहिजेत. या तापी माईला त्यासाठी आवाहन करताना येणारे निवेदन तितकेच भावपूर्ण परंतु सम्यक् वाटते.

*हे तापी माई*
*या खानदेशला खरोखुरी तुझीच पुण्याई*
*तुझा हा अखंड प्रवाह वर्षभर वाहू दे.*
*ही खानदेशची शेतीमाती हिरवीगार होऊ दे.*
*तू अशीच अखंड वाहत रहा.* (पृ. ११)

खानदेशात अमळनेरच्या शाळेत-छात्रालयात खेड्यापाड्यातील मजूर, कष्टकरी-शेतकऱ्यांच्या मुलांचं शिक्षण होऊ लागलं. त्यांची सहवेदना, सहानुभव आणि बालसुलभ मानसिकता आता कथेच्या रूपातून प्रकटू लागली. तीन मुलं म्हणजे मंगा, बुधा, माधुरी यांचा गोष्टीरूप पट उभा राहतो. गोड गोष्टीतली मुलं, त्या मुलांचा लळा आणि त्यांचं भावविश्व फुलत जातं. त्याचं प्रकट चिंतनही पुढील शब्दातून व्यक्त होते. मुलातले - फुलातले सानेगुरुजी बोलू लागतात...

*मुलं माझ्या शाळेला*
*मुलं माझ्या आयुष्याला*
*हिंदोळा देतात*
*त्यांच्यासाठी माझ्या लेखणीत*
*नवे नवे शब्द उतरतात* (पृ. १२)

अमळनेरच्या प्रतापमीलचं कामगाराचं, कष्टकऱ्याचं जीवनविश्व कसं दु:खानं भरलेलं आहे, त्याचं चित्रच उभं राहातं या कवितेतून! रक्त आटून भकाळी झालेला कामगार, दुष्काळात निराधार झालेला शेतकरी, भरभक्कम गलेलठ्ठ झालेला कापूस कारखाना, गिरण्याच्या धुराड्यात धुराइतकाच काळपट खंगून गेलेला मरणासक्त कामगार, याचं विदारक चित्र उभं होतं. कामगार संघटना, उपोषण, सत्याग्रहाचं गांधी - विनोबांचं शांततेचं शस्त्र या बलदंड प्रतापमीलच्या महाद्वाराशी उगारलं पाहिजे. देशाच्या पारतंत्र्याचा गुलामीचा काळा इतिहास, शोषणाची व्यवस्था याविरुद्ध लढा देण्याचे विचार डोक्यात भणाणतात. गांधीजींच्या, विनोबांच्या स्वातंत्र्याच्या प्रेरणा अस्वस्थ करतात. नोकरी सोडून शांततेच्या मार्गानं झगडलं पाहिजे, असा निर्धार व्यक्त होतो. (पृ. १४) नोकरीचा राजीनामा आणि

देशसेवेचा निर्णय ठाम होतो. कायदेभंग चळवळीचे दिवस आठवतात. विनोबा भावे यांचा आदर्शच उभा राहतो. जेल भरो, कारागृहात रवानगी, पुन:पुन्हा तुरुंगात जाण्याची वेळ येते. तुरुंगाच्या विद्यापीठात गीता प्रवचन, श्यामची आई अशी निर्मिती होते.

*पाच रात्री शामसाठी कारागृहात गेल्या*
*काळोखाला अक्षरांचा नवा गंध आला.* (पृ. १५)

सानेगुरुजींच्या सर्जनशील मनाचा आविष्कार, लेखकाच्या-कवीच्या काव्यमय मनातील स्पंदने ना. धों. महानोर यांनी नेमकेपणानं टिपल्यामुळे त्यांनी त्यांच्यावरील काव्यसंस्कारांचा वेध घेताना माधव ज्युलीयन यांच्या प्रेमस्वरूप आई.. या कवितेचा योग्य वापर निवेदनासाठी केला आहे. त्यानंतर गिरणेच्या तीरावर कविता लिहीत बसलेला केशवसुतांसारख्या दिग्गज कवीच्या नव्या मनूची जाणीव व्यक्त होते. नवा शिपाई प्रेरणा देतो आणि सानेगुरुजींच्या मनात कुठला धर्म! माणुसकीचा धर्म की समतेचा धर्म - कुठला खरा धर्म? (पृ. १७) असा प्रश्न उभा राहतो. नवा धर्म साहित्यात सांगायला हवा अशी मनोमन विचारांची स्वच्छता, निरामयता प्रकटल्यावर 'खरा तो एकचि धर्म जगाला प्रेम अर्पावे' ही ठाम झालेली भूमिका व्यक्त होते. धर्माच्या नावाखाली काय काय चाललंय याचा निषेध करून धर्मावरचं चिंतनमय भाष्य प्रकटतं.

*मला बघवत नाही, मला ऐकवत नाही.*
*धर्म म्हणजे भस्मे, सोंग-ढोंग नव्हे*
*धर्म म्हणजे सर्वांसाठी धारणा व्हायला हवे.*
*विषमता तिथे धर्म नव्हे*
*समता तिथे धर्म*
*तोडण्यासाठी नसतोच कधी, जोडण्यासाठी धर्म* (पृ. १७)

सानेगुरुजींच्या भारतीय संस्कृतीच्या चिंतनाच्या मुशीतला धर्मविचार समता, बंधुता, स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारा आहे. श्यामची आई पुस्तकातून 'मोह सोडणे म्हणजे धर्म' ही धर्माची सर्वसमावेशक व्याख्या गुरुजींनी दिली आहे. कोणत्याही धर्ममार्तण्डाने धर्माची इतकी सुलभ परंतु व्यापक व्याख्या केली नाही. ती सानेगुरुजींनी केली. ना. धों. महानोरांनी या विचारसूत्राची मांडणी या भावकाव्यातून अचूकपणानं केली आहे.

भारतीय राष्ट्रीय काँग्रेस. १९३६ साली फैजपूर येथे भरलेली खेड्यातील काँग्रेस! गांधीजींच्या खेड्याकडे चला या भूमिकेतून भरलेलं अधिवेशन महत्त्वाचं ठरलं. सानेगुरुजींनी स्वातंत्र्यज्योत फैजपूरला आणली. गावागावात काँग्रेसचा व स्वातंत्र्याचा विचार पोहचला. खेड्यातली काँग्रेस स्वातंत्र्याची प्रेरणी ठरली. जनजागृतीचा मंत्र ठरली.

*मोहळासारखं भरलेलं लहानसं फैजपूर*
*खेड्यातल्या माणसांचा फैजपूरला महापूर*










*खेड्याकडे चला... फैजपूरला चला*
*गांधीकडे चला... स्वातंत्र्यासाठी चला* (पृ. १८)

खेड्याला नवी जाग आली. स्वातंत्र्याचा विचार पायपीट करून खेड्यापाड्यात पोहोचवला. या पायपीट करण्याचा उद्देश 'उठवू सारे रान' या गाण्यातून सर्वत्र घुमला. त्याचं निवेदन गुरुजी करतात. या निवेदनामुळे (गीतामुळे) गाण्याची लय वाचकांच्या अंतरंगात घुमते. सानेगुरुजींच्या मुखातूनच जणू ते ऐकण्याचा आनंद प्राप्त होतो.

स्वातंत्र्याचा घोष गावागावात घुमू लागला. क्रांतीची मशाल सर्वत्र पेटली. जालियनवाला बागेची करुण कहाणी घडली. सुभाषबाबूंचे सडेतोड विचारही समग्र क्रांतीच्या दिशेने अंतरंगी ठसले. नंदुरबारच्या शिरीषकुमारचे बलिदान घडले. कारागृहात पुन्हा पुन्हा स्वातंत्र्यवीर अडकू लागले. या कारागृहातल्या प्रचंड अस्वस्थतेतूनच लेखन झालं.

*जे बोलायचं सांगायचं*
*ते लिहिलं पाहिजे, या पणतीच्या उजेडात....*
*लिहून पुस्तकांनी पेरलं पाहिजे*
*देशभरातल्या लोकात प्रत्येक घराघरात* (पृ. २४)

रवींद्रनाथांचं साहित्य, जगभरचं साहित्य, जगभरचं तत्त्वज्ञान अनुवादित करण्याची मनीषा मनात घट्ट बसलेली. जगात जे सुंदर, जगात जे चांगलं ते अनुवादातून वाचकांपर्यंत पोहचलं पाहिजे. पू. सानेगुरुजींच्या साहित्यनिर्मितीची व सामाजिक बांधीलकीतून साहित्यसेवेची तळमळच या भावकवितेतून सर्वत्र अवतरते. सानेगुरुजींच्या व्यक्तिमत्त्वावरील सुंदरतेचा रवींद्रनाथ टागोरांचा प्रभाव लक्षणीय होता. तो पणतीच्या उजेडाचा प्रतीकात्मक संदर्भ इथे चित्रित झाला आहे.

भारतीय संस्कृतीच्या मानवतावादी तत्त्वज्ञानाचे उपासक म्हणून सानेगुरुजी सर्वांना माहीत आहेत. ते भारतीय संस्कृतीचे विश्वव्यापी विचारांचे टीकाकार व भाष्यकार आहेत. भारतीय संस्कृतीची बुद्धिमत्ता, ज्ञानपिपासा, धार्मिक सलोखा, विवेकमय विचारांची, संताची मानवधर्माची शिकवण देणारी संस्कृती, विविधतेतूनही एकतेने नटलेली संस्कृती असं वर्णन गुरुजींनी 'भारतीय संस्कृती' या प्रबंधात केलं आहे. आंतरभारतीचे त्यांचे स्वप्न, विविध भाषांतील साहित्याचा अभ्यास करण्याची वृत्ती, भारतीय भाषा निराळ्या असल्या तरी संस्कृतीचे दूध एकच आहे. भारतीय संस्कृती एकरूपी आहे.

*साहित्य म्हणजे श्वास*
*नव्या अध्यात्माचा भास*
*सगळ्यांसहित साहित्य...*
*ते साहित्य लिहून व्हावं*
*काळोखाच्या भिंतीमध्ये*
*लिहिता लिहिता नवं व्हावं.* (पृ. २७)

सानेगुरुजींनी 'स्त्रीजीवन', 'स्त्री हृदय' या संग्रहांत गावोगावींची लोकगीते (ओव्या) संकलित व संपादित केली आहेत. हा निरक्षर मातांचा भावसाक्षर खजिना स्त्रीधन, स्त्रीमनाचा आविष्कार आहे, या लोकतत्त्वीय अभ्यासाची भूमिका पार पाडताना जात्यावरील श्रमांचं नातं स्त्रीजीवनाचा हृदयस्पर्शी संबंधच होतो. जीवनाचं व्यापक विद्यापीठ म्हणजे ही लोकगीतं! मातृहृदयाचा खजिनाच!

*जात्याच्या पाळूशी नातं जोडलेल्या स्त्रिया*
*आयुष्याचं पीठ झालेल्या स्त्रिया*
*दुःखाचं कारुण्यगीत गातानाही हसणाऱ्या स्त्रिया*
*अक्षरही लिहिता येत नाही*
*तरीही महाकाव्य गाणाऱ्या स्त्रिया...*
*त्यांच्या डोळ्यांत आईला बघत राहिलो.* (पृ. २९)

कवी महानोरांनी लोकगीतातील एका ओवीपासून ही कविता सुरू करून सानेगुरुजींच्या अंतरंगाची पारदर्शक काच स्वच्छ पुसून तिला अधिक चकचकीत केली. "माझ्या अहंकाराचं, (कवितेचं) पान तिथे पुसून टाकलं." असा प्रांजळ विचारही मांडून लोकतत्त्वीय अभिजात स्वयंस्फूर्त मौखिक काव्याचं मोठेपण मान्य केलं. आई गेल्याचं अतीव दुःख आणि वहिनींच्या आजारपणाची जीव हेलावून टाकणारी वार्ता या घटनांतून सानेगुरुजींच्या भाबड्या मनाचा व कौटुंबिक जिव्हाळ्याचा परिचय होतो. त्याच वेळी साबरमती आश्रमात आधी जायचं की आजारी वहिनींना भेटायचं याबाबतचा गुरुजींच्या मनातला गोंधळ व्यक्त होतो. परंतु कुटुंबापेक्षा राष्ट्र मोठे आणि स्वातंत्र्यलढ्यातील कार्याला दिलेलं अग्रक्रमाचं महत्त्व यामुळे आधी साबरमती आणि नंतर मुंबईला वहिनीकडे जायचं ठरतं. (पृ. ३०-३१)

खानदेशातील नेर, अमळनेर, धुळे, थाळनेर असा दौरा धरणगावी येतो. निसर्गकवीचा बालकवी ठोंबरे यांच्या भावपूर्ण आठवणी आणि निर्जन वस्तीच्या मंदिरात भेटलेली म्हातारी आजीबाई, तिचे शून्य शोधणारे डोळे (पृ. ३३) ती बाई म्हणजे पार्वतीबाई ठोंबरे (पृ. ३४)

खानदेशच्या लोकांनी भरभरून प्रेम दिलं. पैशांची थैली अर्पण केली. गावागावात बंधुभाव, मानवतेचा विचार भाषणातून कथन केला. राष्ट्रगीतातून व स्फूर्तिगीतांतून नवचैतन्य फुलत गेलं. जीवनाचा नम्र उपासक बनून 'बलसागर भारत होवो विश्वात शोभूनी राहो.' (पृ. ३७) असा जयघोष निनादला. आंतरभारतीचे आणि साधना साप्ताहिकाचे कार्य समाजात रूढ झाले. खानदेशात जीव रममाण झाला. जीवभावाचा गोतावळा मिळाला (पृ. ३८) यानंतरच्या काळातच घडली अत्यंत हृदय हेलावणारी घटना. गुरुजी कोलमडून पडले. अस्वस्थ झाले. देश हादरला... हळहळला.

*महात्मा गांधींचा निर्दय खून*
*त्यासाठी कोण्या कवीनं लिहिलेल्या ओळी*
*देशात सुरू झालीय पुन्हा जातीपातीची होळी...* (पृ. ३९)

*हा झोपडीतला महामानव-मोहनदास करमचंद गांधी*
*या महामानवाचा खून...भारतीय स्वातंत्र्याचा खून.* (पृ. ४०)

हाडामांसाच्या शरीराचा खून केला, परंतु विचारांचा, सार्वभौम सत्याचा खून करता येणार नाही. गुरुजींनी उपोषण केलं. स्वातंत्र्य मिळालं. स्वातंत्र्याची ध्वजा उंच उंच उजळली. म. गांधीजींची तस्वीर भिंतीवर लावून खोट्यानाट्या शपथा घेणारे लोकप्रतिनिधी आणि लोकशाही स्वातंत्र्याचा खोटाच जयघोष अशी विदारक स्थिती. सत्तेच्या वाट्यासाठी अडून बसलेले प्रतिनिधी, देशाची झालेली चिरफाड-सारं काही विचित्र असं वातावरण. त्या वेळी गुरुजींच्या मनाची अवस्था टिपताना कवी महानोरांनी गांधीबाबाच्या संदर्भातील गुरुजींच्या अंतरंगाचा घेतलेला वेध अचूक व अर्थपूर्ण ठरतो.

*गांधीबाबा, तुझ्याशिवाय-*
*देश अर्थहीन वाटतो*
*हा सगळा संसार अर्थहीन वाटतो*
*पानझड झालेल्या झाडासारखा हा देश...*
*ओरबाडून टाकल्यागत वाटतो* (पृ. ४२)

अमळनेरच्या आठवणी, दुष्काळी वातावरण, भादली स्टेशनजवळच्या बालकवींच्या मृत्यूच्या गलबलून टाकणाऱ्या स्मृती, तत्त्वज्ञान केंद्राच्या आठवणींचा गलबला सारं मन ढवळून निघतं. यांचं चित्रण भावमय, काव्यपूर्ण आणि ससंदर्भ काव्यातून प्रकटत जातं. दु:ख, कारुण्य, भय, विपन्नावस्था आणि सानेगुरुजींच्या अंत:करणाची सदाचीच घालमेल या भावकवीचा ओघवता स्रोत बनून शब्दांकित होते. स्वप्नावस्था आणि त्यातील सूचक दु:खाची चाहूल कवी महानोरांनी आत्मौपम्य साधून, गुरुजींच्या अंत:करणात परकाया प्रवेश करून अचूकपणानं मांडली आहे.

शेवटचा मुंबईचा प्रवास, मुंबईची घबराट, मनूची घबराट, भांबावलेले डोळे, रात्र... पुन्हा काळोख... स्वप्नांचा विळखा हे सर्व एका भयाण व भयानक मृत्यूच्या दाराकडे जाण्याचे संकेतच कवीने टिपले आहेत.

*पुन्हा रात्र - पुन्हा काळोख*
*काळोख, काळोख आणि काळोख*
*ती स्वप्नातली कविता पुन्हा घिरट्या घालीत येते*
*घिर घिर घिरट्यांनी भिरंगत राहाते.*
*कोनाड्यात बंद जळणाऱ्या पणतीला*
*विझून टाकते.* (पृ. ४७)

गुरुजींच्या मृत्यूचे व शेवटच्या मनोवस्थेचे वर्णन करताना बालकवींच्या मृत्यूचा प्रसंग आणि त्यातून सूचक स्वप्नांच्या अवस्थेतून व्यक्त करण्याची कल्पकता कवी महानोरांची

स्वतंत्र निर्मितीची प्रातिभिक अवस्थाच आहे. 'विझणारी पणती' आणि चित्ररूप दृकप्रतिमांचा वापर लक्षणीय ठरतो. शेवटी भावांजलीच्या शब्दांत ही दीर्घ भावकविता सफल संपूर्ण होते. ती खास महानोरांच्या भावपूर्ण शैलीतच-

*गेली ज्योत विझून मंदिर सुने,*
*अंधारले भोवती पणतीचे तिमिरात अश्रू उरले,*
*उरल्यात ओल्या स्मृती सकलांच्या हृदयांतरी*
*अजुनीही करुणार्त तू माऊली राष्ट्राचा वटवृक्ष*
*दाट तरी ही करपून गा सावुली* (पृ. ४८)

साने गुरुजींच्या प्रेमळ, करुण परंतु भव्योदात्त जीवनाचे हे भावकाव्य समरसून लिहिले गेले आहे. महामानवांच्या व त्या अनुषंगाने आलेल्या काव्यप्रतिभेच्या भावनांचा हा दीर्घपट सर्जनशील अभिरुचीचा व कवीच्या भावकाव्याचा महत्त्वपूर्ण आविष्कार ठरतो. या कवितेतून एका जीवनाचा जसा पट उलगडत जातो तसा एका सर्जनकाराच्या मनाचाही भावपट आरेखित होत जातो. जावे त्याच्या वंशा अशा वृत्तीतून या काव्याचा वेध घ्यावा लागतो. म्हणूनच थोर विचारवंत समाजसेवक प्रा. ग. प्र. प्रधान यांनी प्रस्तावनेत मांडलेले विचार महत्त्वपूर्ण ठरतात. ''साने गुरुजींच्या जीवनावरील भावकविता हा महानोरांच्या प्रतिभेचा अनोखा आणि हृदयस्पर्शी आविष्कार आहे... प्रतिभावान कवीच्या भावकाव्यावर भाष्य करायचे नसते. महानोर यांच्या या भावकवितेतून आपल्याला एका महामानवाच्या उदात्त आणि पवित्र जीवनाचे दर्शन होते. आपले मन भावाकुल होते.'' प्रधान मास्तरांच्या पाईकपणामुळे आणि पू. साने गुरुजींच्या समग्र साहित्याचा एक अभ्यासक या नात्याने; कवी महानोरांच्या या भावकाव्याचे हार्दिक स्वागत करतो. त्यांच्या काव्यप्रतिभेस सलाम करतो.

**जगाला प्रेम अर्पावे (दीर्घ भावकविता)**
ना. धों. महानोर
पॉप्युलर प्रकाशन, मुंबई (किंमत रु. ६०/-)

**डॉ. किसन पाटील**
'अक्षरवेल' ९/५४-२ शिव कॉलनी, जळगाव

---

## साभार पोच

**शेवटी काय मिळाले (संस्कार कथामाला भाग २)**: विजय नांगरे, संज्योत प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठ ६०
**विठोबांची आंगी** : विनय हर्डीकर, देशमुख आणि कंपनी, पुणे, पृष्ठ २९६
**स्त्री सूक्ताच्या कविता** : बाळकृष्ण सोनवणे, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठ ७२
**वळणावळणाची** : लीला भागवत, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठ १७६
**मिडीया** : विश्वास मेहेंदळे, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठ २४८
**जागरूक वर्गशिक्षक** : राजकुवर गं. सोनवणे, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९४










# रे. टिळकांच्या जीवनावरील चरित्रात्मक कादंबरी 'चालता बोलता चमत्कार'



मृणालिनी शहा

*(ले. अशोक देवदत्त टिळक. पॉप्युलर प्रकाशन, मुंबई २०००, मूल्य रु. ४५०, पृ. ४४०)*

'चालता बोलता चमत्कार' ही रेव्हरंड नारायण वामन टिळक यांच्या जीवनावरची चरित्रात्मक कादंबरी आहे. 'केवढे हे क्रौर्य', 'वनवासी फूल' या कवितांचे कवी म्हणून ते मराठी लोकांना सुपरिचित आहेत. मराठी साहित्यातील श्रेष्ठ कलाकृती म्हणून प्रसिद्ध असलेल्या 'स्मृतिचित्रे' मधून टिळकांचे जीवन आपणा सर्वांना माहिती आहे. लक्ष्मीबाई टिळकांनी 'स्मृतिचित्रे' मध्ये आपल्या पतीच्या– नारायण वामन टिळकांच्या– अनेकानेक आठवणी जतन करून ठेवल्या आहेत. मात्र या सर्व आठवणी आहेत. म्हणून त्यांचे नातू अशोक देवदत्त टिळक यांनी अथक परिश्रमांनी, त्यांच्या शिष्यांना, विरोधकांना भेटून टिळकांविषयीची माहिती मिळवली. त्याचबरोबर त्यांचे विविध ठिकाणी प्रसिद्ध झालेले तसेच अप्रकाशित साहित्य जमा केले व त्याच्या आधारे टिळकांच्या चरित्रावर एक नवीन प्रकाश टाकला आहे. टिळकांचे चरित्र लिहिणे हा हेतू असला तरी ते समग्र चरित्र नाही. जमविलेल्या प्रचंड माहितीच्या आधारे सांगितलेली टिळक-चरित्र-कथा आहे. तरीही संपूर्ण काल्पनिक किंवा निराधार प्रसंग यात नाहीत. त्यामुळेच रंजक, वाचनीय आणि तरीही प्रमाण आधारभूत असे या कादंबरीचे स्वरूप बनले आहे. प्रारंभापासून वाचकांच्या मनाची पकड घेणाऱ्या कादंबरीच्या कथानकात टिळकांचे चरित्र चार भागांतून आणि लहानमोठ्या अनेक प्रसंगांतून साकार झाले आहे.

६ डिसेंबर १८६१ ते ९ मे १९१९ असे ५८ वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले होते. त्यांची आई जानकीबाई यांना पद्यरचनेचा नाद होता. त्यांच्यामुळे बालवयातच टिळक ओव्या, अभंग, दिंडी इत्यादी पद्यरचना करू लागले. लहानपणापासून त्यांच्या आजोबांमुळे संतवाणीचे संस्कार त्यांच्यावर झाले होते. भक्तिभावना खोलवर रुजली होती.

त्यांचे वडील वामनराव तलाठी होते. त्यांच्या वारंवार बदल्या होत. ते आचरणाने शुद्ध, पण कर्मठ व तापट होते. त्यांचा टिळकांवर फार राग होता. त्या दोघांचे कधीच



अनुक्रमणिका

फारसे जमले नाही, त्यासंबंधीचे चित्रण गमतीदार पण वेधक झाले आहे. टिळकांचे सर्वस्व होती ती त्यांची आई. ते मातृभक्तच होते, असे म्हटले तरी चालेल. पुढे 'गंगा' ही काव्यरचना त्यांनी आईला निष्ठापूर्वक अर्पण केली आहे.

टिळकांचे प्राथमिक शिक्षण कल्याणला व पुढे नाशिकास झाले. नाशिकच्या वास्तव्यात टिळकांची प्रतिभा विकसित झाली. तेथील स्वसुधारणेच्छू सभेमुळे त्यांच्यावर वक्तृत्वाचे संस्कार झाले. गणेशशास्त्री लेले या गुरूच्या सहवासात टिळकांनी कालिदास, भवभूती, बाण इत्यादी अभिजात कवींचे काव्य वाचले. त्यांच्या इंग्रजी अध्ययनाची कथा ऐकण्यासारखी आहे. इंग्रजी कसे शिकावे असे एका मित्राला विचारल्यावर त्याने सांगितले की, डिक्शनरीतील शब्द पाठ करायचे. टिळकांनी त्यातील एम पर्यंतचे सर्व शब्द तोंडपाठ केले. नाशिकच्या शाळेचे हेडमास्तर त्यांची स्मरणशक्ती पाहून चकित झाले होते. त्यांच्या बुद्धीचे, शीघ्रकवित्वाचा प्रत्यय देणारे अनेक प्रसंग यात आहेत. १८७९ मध्ये त्यांचे मनकर्णिका गोखले या लहानपणापासूनच्या मैत्रिणीशी लग्न झाले. त्यांच्या वैवाहिक आणि कौटुंबिक जीवनातील घटना लेखकाने साक्षात उभ्या केल्या आहेत. लग्नानंतर टिळक नाशिक, जलालपूर, धामक, नागपूर, मुरबाड, मुंबई, पुणे, राजनांदगाव इत्यादी ठिकाणी भ्रमंती करत होते. या काळात त्यांनी कीर्तने केली. शाळा उघडल्या. पुस्तके लिहिली, मासिके काढली, पण कोठेही स्थिरावले नाहीत. त्यांच्या अशांत मनोवृत्तीचे अनेक दाखले अशोक टिळकांनी दिले आहेत. त्यामुळे त्यांच्या कुटुंबाला कधीकधी त्रासही होई. पण या चित्रणातून टिळकांची प्रतिमा कोठेही मलीन होत नाही.

भिन्न धर्ममतांचा व शास्त्रांचा अभ्यासही त्यांनी केला. ख्रिस्ती धर्माकडे त्यांचे मन लहानपणापासून ओढ घेत होते. १८९५ मध्ये त्यांनी ख्रिश्चन धर्म स्वीकारला. त्यांचे हे धर्मांतर महाराष्ट्रात फार गाजले. अनेकांनी त्यावर उलटसुलट चर्चा केल्या. हिंदू धर्माचे कीर्तनकार, धर्मशास्त्री, विद्वान, योगी, गोसेवक आणि देशभक्त असणाऱ्या माणसाने ख्रिस्ती धर्म स्वीकारावा हा लोकांना चमत्कार वाटत होता. टिळकांनी लोकांच्या या क्रियाप्रतिक्रियांची 'एका विद्यार्थ्याची साक्ष' या नावाच्या लेखातून दखल घेतली. त्यांनी जरी स्वत: धर्मांतर केले होते, तरी लक्ष्मीबाईंना व मुलाला– देवदत्ताला त्यांनी धर्मांतराची बळजबरी केली नाही. त्यांना स्वातंत्र्य होते. पण पुढे पाच वर्षांनी त्या दोघांनीही ख्रिस्ती धर्म स्वीकारला. टिळकांचा विश्वास खरा ठरला. येशूवर त्यांची नितांत श्रद्धा होती.

लहानपणचे भक्तिभावनेचे संस्कार यातून दिसतात. पुढे ते रेव्हरंड झाले. २२ वर्षे त्यांनी नगरला आणि शेवटची दोन वर्षे सातारला धर्मगुरू म्हणून निष्ठेने काम केले. मुंबई येथील शेवटच्या आजारपणात त्यांनी मृत्यूचा आनंदपूर्वक स्वीकार केला होता, हे त्यांच्या शेवटच्या अभंगरचनेतून लक्षात येते. त्यांनी जरी ख्रिस्ती धर्म स्वीकारला होता तरी त्यांच्या आचारधर्मातील न पटणाऱ्या गोष्टींना त्यांनी विरोध केला होता. मुलाच्या लग्नात त्यांनी ख्रिश्चन आणि हिंदू संस्कारांचा मेळ घातला होता. त्यांचे मृत्युपत्रही त्या दृष्टीने विलक्षण



अनुक्रमणिका







आहे. "मृत्यू म्हणजे देवाची हाक. देवाज्ञा. त्यात अशुभ काही नाही म्हणून अंत्यसंस्कारात काळा रंग वर्ज्य करावा" असे त्यांनी सांगितले होते. तसेच मृत्यूनंतर आपले दहन करावे, अशी इच्छा त्यांनी प्रकट केली होती. धर्मांतरामुळे टिळकांच्या दहनासाठी हिंदू स्मशानभूमीवर थारा मिळाला नाही, म्हणून चिनी लोकांच्या दहनभूमीवर त्यांच्यावर अग्निसंस्कार केले गेले. अनेक चमत्कारांनी युक्त असलेले त्यांचे चालते-बोलते जीवन कथन करताना अशोकरावांची भाषा साधी, सरळ आहे. तत्कालीन अनेक लोकांचे चित्रणही मनोज्ञ झाले आहे. उदा. बालकवी, गोविंदाग्रज इत्यादी. तो काळही जिवंत करण्यात लेखक यशस्वी झाला आहे. टिळकांच्या साहित्यकृतींचा, कवितांचा फार चांगला उपयोग या कादंबरीत करून घेतला आहे. काव्यमयता, वाचनीयता या गुणांनी युक्त अशी ही चरित्रात्मक कादंबरी सर्वांना आवडेल अशी आहे.

**मृणालिनी शहा**

१, शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवन, पुणे ४११ ००४

❑

---

## साभार पोच

**मराठी भाषा अध्यापनातील क्षेत्र प्रयोग :** राजकुमार गं. सोनवणे, अनुबंध प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४४

**मराठी भाषेचा इतिहास :** गं. ना. जोगळेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ २४४

**तनमन :** संजय ओक, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ २४०.

**आदिवासी क्रांतिकारक :** गोविंद गारे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ २३४.

**जीवनशैली :** ह. वि. सरदेसाई, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ २०२

**पर्यावरण आणि संस्कृती :** मधुकर ढवळीकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ १७४

**बहुविकलांगता दक्षता-उपचार :** म. ग. गोगटे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९६

**कहाणी वग सम्राटाची :** प्रभाकर ओव्हल, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९४

**वाघ :** अतुल धामनकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठ ११०

**आम्ही वाईकर :** संपादित, अक्षर भांडार प्रकाशन, पुणे, पृष्ठ २५४

**महाडचा मुक्तिसंग्राम आणि नानासाहेब टिपणीस :** सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४०

**वेदोक्त :** कृ. गो. सूर्यवंशी, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४८

**मैदानातील माणसे :** अर्जुन डांगळे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ९२

**सनातनी धर्मग्रंथाची मानवघातकी शिकवण :** का. शि. संकाये, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ५६

अनुक्रमणिका



# कुणब्याचा प्राणांतिक 'टाहो'
## (इंद्रजित भालेराव यांची कविता)



**आसाराम लोमटे**

अस्मानी आणि सुलतानी संकटांची मालिका, शेतीव्यवस्थेची झालेली परवड, त्यातून आलेला कर्जबाजारीपणा आणि कर्ज फेडता येत नाही म्हणून आत्महत्येच्या कड्यावर उभा असलेला शेतकरी अशा समकालीन वास्तवाला मुखर करणारा 'टाहो' हा इंद्रजित भालेराव यांचा नवा कवितासंग्रह.

'पीकपाणी', 'काबाडाचे धनी', 'पेरा' या सारख्या कवितासंग्रहांतून सशक्त ग्रामीण अनुभूती देणारी त्यांची कविता 'टाहो' या कवितासंग्रहात आणखी उन्नत झाली आहे. त्यांच्या कवितेची मातीशी असलेली घट्ट नाळ, लोकपरंपरेचे सजग भान आणि बोलीभाषेतून चित्र रेखाटण्याची अभिजात शैली या गोष्टींचे मराठीतील समीक्षक आणि रसिकांनी उदंड कौतुक केले आहे. ही सारी वैशिष्ट्ये 'टाहो' या कवितासंग्रहातही आहेतच, मात्र शेतकऱ्यांच्या व्यथा शब्दात बांधताना बांधीलकीची भावना आणि शोषणाबद्दल, शोषकांबद्दल एक आक्रमक असा स्वरही भालेराव यांनी या कवितासंग्रहात लावला आहे. केवळ वृत्तपत्रातूनच शेतकऱ्यांच्या आत्महत्येच्या बातम्या वाचणाऱ्या वर्गाला ही कविता अस्वस्थ तर करतेच; पण या साऱ्या कविता वाचून मनात असंख्य प्रश्नांचा धुराळा उडालेल्या वाचकाला आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांचे उद्ध्वस्त संसार नजरेसमोर दिसतात आणि तो आणखीच सुन्न होतो.

या कवितासंग्रहात एकूण ६४ कविता आहेत. टाहो (२८), उपाय (६), शीळ (८), जागतिकीकरण (५), माती-पाणी (९), माये (१६) अशा विभागांत त्यांचे वर्गीकरण झाले आहे. 'टाहो' या विभागातील कवितांमध्ये शेतकऱ्याच्या आत्महत्येचे थेट संदर्भ असणाऱ्या कविता आहेत.

*टाहो फोडला बापानं*
*पाच दरीत विरला*
*आत्महत्येचा पहाड*
*त्याच्या पोटात शिरला.*

या शब्दात शेतकऱ्यांचे विराट दुःख मांडून या दुःखाची सनातन अशी गाथाच पुढच्या

कवितांमध्ये पाहायला मिळते. 'विठ्ठलाला गौरवीत आणि दुष्काळाच्या नावानं गहिवरत वर्षानुवर्षे दिंड्या निघत राहिल्या मात्र कोणत्या गहिवरानं 'त्यांचा' गळा दाटून येतो हे न कळताच पंढरपुराला धन्य वाटत राहिलं, असा आशय सांगणारी कविता या दु:खाचा धागा थेट परंपरेशी नेऊन भिडविते. त्यानंतर एक-एक पीळ उलगडत जातात. तुकारामही याच वाटेनं गेल्याच्या खुणा मुक्तीचा कोणता मार्ग दाखवितात. या सारखा प्रश्न केवळ कवीलाच नव्हे तर वाचकालाही पडतो.

*ज्या सुत्रानं चालवायचास बैलांची बुद्धि आणि*
*करून घ्यायचास कुणबीक*
*तो तुमच्या मधल्या संबंधाचा आसरा*
*तोच कासरा शेवटी उपयोगात आणलास.*

किंवा

*ज्या फांदीनं पाहिला तुझा नवतीचा शृंगार*
*तिच्याच आधारानं आज शेवटही केलास.*

या सारख्या कविता वाचकाला व्याकुळ करतात. ज्याचे नाते मातीशी आहे, जो दुष्काळ-दारिद्र्यातही चिवट संघर्ष करतो, जो नित्य नवे अंकुर जन्माला घालतो; त्याचे कणा मोडून पडणे, हताश होणे आणि अखेरीस गळफास घेणे, संवेदनशील मनाच्या ठिकऱ्या उडविते. घरातील कर्तासवरता पुरुष गेल्यानंतर स्त्रीचा तुटलेला जन्माचा आधार आणि नंतरचे वैराण आयुष्य याचीही चित्रणे अनेक कवितांत आहेत. मुळातच भालेराव यांच्या कवितेतून आविष्कृत होणारी ग्रामीण स्त्री ही कमालीची सोशिक, कष्टाळू आणि कुटुंबासाठी खस्ता खाणारी आहे. अशा स्त्रियांची विविध रूपे त्यांच्या कवितांतून पाहायला मिळतात. या स्त्रीचे तिच्या पतीशी असलेले संबंध हे केवळ औपचारिक आणि निव्वळ भावनिक असेही नसतात, तर श्रमाच्या नात्यातून ही वीण आणखीच घट्ट बनते. या नात्याला घामाचा गंध असल्याने हे नाते अतिशय उत्कट आणि शाश्वत असे वाटते. अशीच 'ती' एकदा 'त्याची' भाकर घेऊन शेतात येते आणि तो आवेगाने तिच्यावर तुटून पडतो. त्याच झाडाखाली आता ती जेव्हा उभी असते तेव्हा तो प्रसंग तिला साक्षात आठवतो. मात्र आता आयुष्यात 'त्याची' साथसोबत नसते. 'तिच्या पोटातला व्याकुळ खड्डा आता कशानेच बुजणार नाही' या शब्दात कवी तिचे जन्मभराचे दु:ख व्यक्त करतो.

दुसऱ्या एका कवितेत 'तिला' वैधव्य आल्याने आयुष्याचा सगळा प्रवासच खडतर बनतो. उभ्या जन्माचा उन्हाळा झालेल्या 'तिचे' आता पुढचे आयुष्य कसे असेल?

*तिच्या कपाळावरच्या कुंकवाची लालजर्द*
*जाळाची भिती संपल्यामुळे*
*कुपाटी आता रानात शिरेल, वाटा धान तुडवितील.*











असे स्त्रीच्या आयुष्याचे अनेक कंगोरे या कवितेत दिसून येतात.

दु:ख दळून खाणाऱ्याला आत्महत्त्येच्या कड्यावर येऊन का उभे राहवे लागते? असे कोणते वास्तव त्याच्यासमोर वाढून ठेवले आहे की, त्याचा जांव घुसमटतो? असे प्रश्न आपल्यालाही पडतात मात्र जेव्हा भालेराव आजचे खेडे आपल्यासमोर उभे करू लागतात, तेव्हा या प्रश्नांची उत्तरे आपोआप मिळतात.

***वेदनेनं कळवळून गायीनं झाडाव्यात***
***तशा मातीनं झाडल्या माथ्यावर दुष्काळाच्या लाथा.***

असे बारोमास दुष्काळी जिणे पदरी आल्यानंतरच माणसे जगण्याची उमेद हरवतात. कुणासाठी मदतीच्या हाका मारल्या तर प्रतिसादाची लकेरही उमटत नाही. अशावेळी मग कोणताच उपाय दिसत नाही.

***वाहून गेलेल्या मातीच्या नशिबासारखी***
***कष्टाच्या प्रतिसादाला पारखी***
***जमिनीला रेटा देऊन अर्धवट उठतात.***

अशी कष्टाने झिजून मरणारी माणसे खूप उरस्फोड, संघर्ष करूनही हाती मातीच येते; या भावनेने खचून जातात. उठून उभे राहण्याचे अवसानही ते गमावून बसतात. अशावेळी एकच उपाय दिसतो. 'बापानं आत्महत्या केली, आईच्या डोक्यावर परिणाम झालाय आणि लग्नाच्या दोन थोरल्या बहिणी आहेत.' आता हा प्रश्नांचा डोंगर कसा पार करणार? असा प्रश्न अकरा वर्षांच्या मुलाला विचारला, तर तो म्हणतो, 'अख्ख्या एंड्रीनचा डब्बा पिऊन बाप या प्रश्नातून मुक्त झाला, मला तर एक ढक्कनही पुरेल.' असे त्या मुलाचे उत्तर एका विदारक वास्तवाचे दर्शन घडविते.

मात्र ही कविता केवळ दु:खाचे कढ आळविणारीही नाही; तसे असते तर केवळ 'मर्तिकाचे गाणे' एवढेच तिचे स्वरूप राहिले असते. शेतकऱ्याला आयुष्यातून उठविणारे जे कुणी आहेत, त्यांच्या मुसक्या आवळण्याची जरबही या कवितेत आहे. 'भारतात' राहणाऱ्याचं शोषण करणारे, त्याची लुटमार करणारे 'इंडिया'तले जे रहिवासी आहेत त्यांचं काळीज कधी उलेल? शेतकऱ्यांच्या आत्महत्येने त्यांच्या आतड्यांना पीळ कधी पडेल? या प्रश्नांची उत्तरे कवीकडे आहेत. 'उपाय' या विभागात ती वेगवेगळ्या मार्गांनी व्यक्त होतात.

***हे बुजगावण्याला घाबरत नाहीत.***
***गोफणगुंडाच घ्यावा लागेल हातात***

असा उपाय सांगणाऱ्या या कवितेची जातकुळी शेतीव्यवस्थेच्या शोषणाची मांडणी करणाऱ्या 'शेतकऱ्याच्या आसुडा'शी नाते सांगणारी आहे.

***यांना टाकावं खळ्यात बैलांच्या पायाखाली***
***म्हणजे हे मोकळे होतील खाकऱ्यातून***



अनुक्रमणिका







*जात्यात घालून यांना छान म्हणावी ओवी*
*म्हणजे यांच्यातलं सत्व निकं होत जाईल.*

असे अनेक उपाय या कवितेने सुचविले आहेत. कर्ज बुडविणे पाप समजणारा पुण्यवंत आत्मा जगाच्या पाठीवर फक्त शेतकरीच आहे असे ही कविता अभिमानाने सांगते. घेतलेले कर्ज फेडता येत नाही म्हणून प्राण देणारे भूमिपुत्र त्यांच्याच हक्काच्या गोष्टीसाठी एवढे हतबल का होतात? 'बदनामी होऊनही जे बदामाचा शिरा खातात अशांच्या जगात हक्काच्या गोष्टीसाठी लाचारी का?' असा धीर ही कविता देते. शेतकऱ्यांबद्दल खोटा पुळका दाखविणारे आणि कोरडा उमाळा व्यक्त करणारे राज्यकर्तेही या कवितेने आरोपीच्या पिंजऱ्यात उभे केले आहेत. सत्ताधारी आणि विरोधक या दोघांकडूनही शेतकऱ्याच्या आत्महत्येचे जे भांडवल केले जाते अशा दोघांनाही कवीने एकाच तराजूत तोलले आहे.

*खरं तर पहिला आणि दुसरा*
*दोघेही एकाच माळेचे मणी*
*दोघे मिळून गुंफीत असतात*
*माझ्या बापाच्या हत्येची कहाणी*

हे भालेराव यांनी मांडलेले उघड सत्य आहे. राजकारण्यांचा मानभावीपणा त्यातून व्यक्त होतो.

शेतकऱ्याला धड नियोजन करता येत नाही, वारेमाप खर्चाची तो अनावश्यक ठिकाणी उधळपट्टी करतो, आवश्यकतेपेक्षा आणि क्षमतेपेक्षा जास्त कर्ज काढतो– अशा काही खास नागरी प्रतिक्रिया नेहमीच ऐकायला मिळतात. 'घेतलेल्या कर्जाचं आणि कुटुंबाचं नियोजन करता येत नाही म्हणून शेतकरी आत्महत्या करतात' असे विधान जेव्हा एखादा पंतप्रधान करतो तेव्हा 'देशाचं नियोजन जमलं नाही, म्हणून किती पंतप्रधानांनी आत्महत्या केल्या?' असा बिनतोड सवाल कवीचा आहे.

मराठी लेखकांना पुरेसे राजकीय-सामाजिक भानच नसते. शिवाय जगण्यासाठी चाललेल्या संघर्षाकडेही ते पाठ फिरवितात असे विचारवंतांचे अभिप्राय नेहमीच वाचायला मिळतात. समकालीन वास्तव मराठी लेखकांना दिसतच नाही. अशीही साहित्यात ओरड होते. या सर्व पार्श्वभूमीवर ही कविता वाचकांसमोर आली आहे. गेल्या काही वर्षांत शेतकऱ्यांच्या आत्महत्या हा सर्वांच्याच दृष्टीने चिंतेचा आणि चिंतनाचा विषय झाला आहे. साहित्यातूनही या अनुभवांना स्पर्श करणारे लेखन होत आहे. मात्र इंद्रजित भालेरावांसारख्या कसदार कवीने हा प्रश्न 'टाहो'च्या रूपाने ऐरणीवर आणला.

**टाहो**
इंद्रजित भालेराव
प्रतिभास प्रकाशन, पृष्ठे ८०,
किंमत ६०. रू.

**आसाराम लोमटे**
श्रद्धा प्रिंटिंग प्रेस, स्टेडियम कॉम्प्लेक्स,
नेहरू रोड, परभणी.



अनुक्रमणिका





# संतांची भावकविता



रवीन्द्र भट

मानवी मनात निर्माण होणाऱ्या नानाविध भावभावनांच्या आंदोलनांच्या अनावर ऊर्मीतून एक लयबद्ध आणि छंदोबद्ध शब्दकळा साकारते आणि आपली अबोध सुरावट घेऊन बहुजनांना पुन:प्रत्ययाचा अनुभव देते. प्रेम, विरह, वात्सल्य, जिव्हाळा, राग, अनुराग, वैषम्य, विषाद, तृप्ती, अतृप्ती, आनंद, दु:ख अशा तऱ्हेची कितीतरी भावनिक आंदोलने मानवी मनात निर्माण होत असतात. सृजनाचे वरदान असलेला कवी-कलावंत हे भाव त्या अबोध सुरावटीमधून व्यक्त करीत असतो. ती अबोध सुरावट मूलत: अनाहत ध्वनीतून जन्म घेते आणि आहत ध्वनीमधून भावगीत होऊन बहुजनांना आकृष्ट करते. संगीताची एक व्यापक व्याख्या करताना पूर्वीच्या शास्त्रकारांनी 'गीतं वाद्यं तथा नृत्यम् । त्रयं संगीतमुच्यते,' असे म्हटले आहे. भावनेला अनुरूप शब्दरचना, तिला अधिक फुलविणाऱ्या वाद्यमेळाचा नाद आणि नृत्याची लय आणि ताल यांमधूनच उत्तम भावगीत तयार होते, हे वेगळे सांगायला नको. अशा तऱ्हेच्या अभिजात भावगीतामुळे शब्दप्रधान गायकीला शास्त्रीय संगीताच्या मैफलीतही एक स्वतंत्र स्थान प्राप्त झाले आहे हेही निर्विवाद.

भावगीत हा मूलत: कवितेचाच आविष्कार आहे. अभिजात कवितेचे ज्ञानदेवांनी केलेले विवेचन सुपरिचित आहे.

*वाचे बरवे कवित्व। कवित्वी रसिकत्व।*
*रसिकत्वी परतत्व स्पर्शु जैसा।।*

या विवेचनात आहतध्वनीपलीकडचा अनाहत ध्वनी ज्या कवितेतून प्रतीत होतो ती अभिजात कविता होय, हेच व्यक्त होते. परतत्त्वाचा स्पर्श झाल्याशिवाय हा अनाहत ध्वनी प्रतीत कसा होणार? मराठी संतांच्या बहुसंख्य गीतांना हा परतत्त्वस्पर्श लाभल्यामुळे ती गीते सर्वार्थाने 'अक्षर' झालेली आहेत.

संतांनी व्यक्तिगत भावकल्लोळाला असलेली ऐहिकाची चौकट दूर करून त्याला चराचर सृष्टीत भरून उरलेल्या चैतन्यशक्तीचा स्पर्श घडविला, आणि व्यक्तीमधील 'मी'चा निरास करून त्याला त्या चैतन्यशक्तीच्या जाणिवेपर्यंत संक्रमित केले. त्याला ईशभक्तीचे झळाळते कोंदण दिले. व्यासभागवतातील कृष्णलीलेमधून सगुणभक्तीला मधुराभक्तीचे









एक नवे परिमाण प्राप्त झाले. बहुसंख्य संतरचनांमध्ये या मधुराभक्तीचा आविष्कार विविध रूपांनी साकार झाला आहे. अवघ्या मानवी भावभावनांचे आणि स्नेहरज्जूंचे उदात्तीकरण करून त्यांना संतांनी मधुराभक्तीमध्ये संक्रमित केले. या संक्रमणाची दृश्य स्वरूपे म्हणजे संतस्पर्श झालेल्या विराण्या आणि गौळणी! मानवी भावभावनांचा इतका उत्कट, मंगल आणि सात्त्विक आविष्कार इतर कुठल्याही साहित्यप्रकारात अभावानेच आढळेल. संतपरंपरेने श्रीकृष्णाच्या बाल स्वरूपाला, प्रियकर स्वरूपाला आणि आदर्श नेतृत्व स्वरूपाला आपल्या अनेक गीतरचनांमधून वर्णिले आहे, आळविले आहे. मुग्ध यौवनातील प्रियकर भेटीची आणि मीलनाची ओढ व्यक्त करणाऱ्या गौळणी आणि विराण्यांमुळे भावकाव्याला परतत्त्वाचा स्पर्श झाल्याचा अलौकिक अनुभव रसिकाला मिळू शकतो. प्रियकर-मीलनाची आर्त ओढ ज्याप्रमाणे ऐहिकातील एखादी प्रेयसी भावनांच्या अनावर कल्लोळातून व्यक्त करते, त्याप्रमाणे ज्ञानदेव-नामदेवादी संतांनी परमेश्वर मीलनाची ओढ या विराणी-विरहिणी रूपकाद्वारे व्यक्त केली आहे. राधा-कृष्णामधील हा हळुवार भावबंध व्यक्त करीत असताना संतांच्या प्रतिभेला नवनवोन्मेषशालिनी धुमारे फुटलेले दिसतात.

श्रीकृष्ण स्वरूपाची ओढ लागलेल्या विरहिणीला त्याच्याविना जगणे मृत्यूसमान वाटते आणि त्याची प्राप्ती अमृतरससेवन वाटते. त्याच्याविना या विरहिणीला निसर्गातील साऱ्या सौंदर्यकल्पनाही आपला विरहसंताप वाढविणाऱ्याच वाटतात.

असा आर्तभाव व्यक्त करणारी ज्ञानेश्वर महाराजांची विरहिणी सुप्रसिद्ध आहे.

*'घनु वाजे घुणघुणा, वारा वाहे रुणझुणा।*
*भवतारकु हा कान्हा, वेगी भेटवा हो।।*
*चांद वो चांदणे, चापे वो चंदने।*
*देवकीनंदनेविण नावडे वो।।'*

मेघांचा घुणघुण ध्वनी, वाऱ्याचा शीतल स्पर्श या गोष्टीही तिच्या विरहाची तीव्रता अधिकाधिक वाढवितात. त्याच्याविना ही मच्छरदाणी, हे शीतल चांदणे, चांदव्याची फुले, चंदनाची उटी यांपासूनही तिला कसलाही थंडावा मिळत नाही. चंदनाच्या चोळीने शीतलता वाटण्याऐवजी तिचे सर्वांग पोळून निघते. त्याच्याविना पुष्पशय्याही अग्नीसारखी दाहक भासते. ही विरहिणी आपल्या सख्यांना आर्तपणे विनविते की, हा विरहाग्नी मला पोळून काढतो आहे. माझ्या देवकीनंदनाची भेट घडवून आणून तुम्हीच तो विझवू शकाल. तुमच्या कोकील स्वरातल्या नुसत्या गाण्याचा मला काही उपयोग नाही. या हातातल्या आरशात मी पाहू लागले तरी त्यात मला माझे रूप दिसत नाही. प्रतिबिंब स्वरूपात तोच मला दिसत असतो.

मीलनोत्सुक युवतीच्या मनातील असंख्य भावतरंगांचे पदर उलगडत माउलीने त्यांच्या मुळाशी असलेले अद्वैत कल्पनेचे व्यापक रूप या विरहिणीमधून अतिशय नेटकेपणाने



अनुक्रमणिका







व्यक्त केले आहे. स्त्री-पुरुष यांमधील जन्मदत्त आकर्षणाला प्रकृती-पुरुषामधील, मायाब्रह्मातील एकरूपतेची असलेली व्याप्ती हेच या गीतप्रकाराचे सर्वोच्चं सौंदर्यस्थळ आहे. व्यक्तीच्या शारीरिक कामवासना शांतीला ऐहिकापलीकडच्या आध्यात्मिक सौख्याच्या चिदानंदस्वरूपाचे व्यापक परिमाण लाभल्यामुळे सर्वसामान्य जीव जो विकार टाळू शकत नाही, त्या विकारालाच पारलौकिकाच्या सर्वांगस्पर्शाचे सौख्य प्राप्त होते!

संतांच्या विराण्या या भावगीतामधील शृंगार रसाच्या आणि भक्तिमार्गातील दास्यभक्तीच्या एकत्रीकरणाच्या अभिनव अशा प्रातिनिधिक रचना आहेत. येथे माउलीच्या आणखी एका विराणीचा उल्लेख करणे अप्रस्तुत ठरणार नाही.

*'पाच दामाचा घोंगडा नेसेन।*
*उरली मोट ते मी जेवीन।*
*कामारी कामारी कामारी होऊन।*
*या गोपाळाचे घर मी रिघेन।।'*

ज्या वस्त्राला पाच पैशाचीसुद्धा किंमत नाही असे जाडेभरडे वस्त्र मी नेसेन. परमात्म्याचे उच्छिष्ट सेवन करून माझी भूक मी भागवेन. त्याच्या दासीच्या दासीची दासी होईन, पण मी त्याच्या मंदिरात प्रवेश मिळवीनच. त्या मंदिरात मला या मर्त्य शरीरभोगाची इच्छाच उरणार नाही. त्याच्या दारात मी पडून राहीन. त्याच्या दाराचा उंबरठा उशाला घेईन. अगदी पडतील ते कष्ट करीन, पण त्याची प्राप्ती करून घेईन, आणि जन्म-मरणाची येरझार चुकवून मोक्षाचे परमपद मिळवीन. कारण,

*'सावळे परब्रह्म आवडे या जीवा*
*मने मन राणीवा घर केले'*

'तो अतिमोहक श्यामसुंदर भगवान श्रीकृष्ण या जीवाला इतका मोहवितो की, माझ्या मनाचेच मंदिर बांधून तेथे परमात्मसौख्य अनुभविण्याचे माझे अंतिम ईप्सित आहे. मी मनोमनी त्यालाच भोगत आहे. काय करू? ते सावळे परब्रह्म मनाला सदैव त्याच्यातच गुंतवून ठेवीत आहे.' ज्ञानदेव म्हणतात, 'मूळ कृष्णस्वरूप असलेल्या सावळ्या विठ्ठलाकडे मनाच्या साऱ्या ऊर्मी, अंत:करणातील सारे सद्भावाचे प्रवाह परस्परांत मिसळून धाव घेत असतात!

हा सारा आविष्कार ऐहिक शृंगाराला व्यापक अद्वैत संकल्पनेत मिसळून टाकणारा आहे. संतांनी आपल्या गीतरचनांमधून मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून पाहिले. विकारांना विकासाची व्यापक चौकट दिली.

संत नामदेव आणि एकनाथ महाराजांच्या गौळणी हे तर मराठी सारस्वताचे एक अविभाज्य अंग आहे. त्या साऱ्यांचाच आढावा विस्तारभयास्तव या छोट्याशा निबंधात घेणे सर्वस्वी अशक्य आहे.

ज्ञानदेवांप्रमाणेच अवघ्या संतमालिकेने या मधुराभक्तीचा आविष्कार आपल्या ईशस्पर्श

गीतरचनांमधून व्यक्त केला आहे. नामदेवांनी या परब्रह्माला साकार करताना आपल्या प्रतिभेने रसिकाला ठायी ठायी मंत्रमुग्ध केले आहे. बालपणी कधी ते कृष्णावर रुसतात. खरवस मिळाला नाही म्हणून हिंपुटी होतात. तुझ्या गाई तूच सांभाळ, मी जातो माझ्या घरी, असा कांगावा करतात आणि लगेचच सारे विसरून त्याच्यासवे वाळवंटी चेंडूफळीचा डाव मांडतात. मोठेपणी त्याला फटकारतात. स्वत:ला पतितपावन म्हणवितोस, पण अवघे पतितच तुझ्या दर्शनसुखाला पारखे झाले आहेत. मी तरी तुझ्या दारी कशासाठी थांबू? मी जातो परत,' म्हणून देवाशी भांडतात आणि प्रौढपणी परमेश्वरप्राप्तीच्या अगदी जवळच्या पायरीवर आल्यावर 'करी अंगसंगा भक्ताचिया' असे त्याला विनवितात, आणि त्याहींवरच्या पायरीवर स्थान मिळाल्यावर वैकुंठाला न येता मी इथे पंढरीतच राहणार. 'आधी पंढरी, मग वैकुंठ' अशी टोकाची भूमिकाही घेतात. देव आणि भक्त यांच्यामधील हे अलौकिक भांडण मधुराभक्तीच्या अंगिकाराशिवाय व्यक्त होणे सर्वस्वी अशक्य आहे.

सश्रद्ध सगुणभक्ती हाच भावगीताचा प्रथम हुंकार आहे, हेच या साऱ्या विवेचनावरून सिद्ध होते. लोकप्रबोधनाचे एक प्रभावी माध्यम म्हणूनही या संतरचनांचे स्थान श्रेष्ठ आहे. यासाठी संतांनी विविध गीतप्रकार समर्थपणे वापरले आणि जनसाहित्याला श्रीमंती आणि सौंदर्य प्राप्त करून दिले. पौराणिक कथानके, भूपाळ्या, काकडे, स्थानमाहात्म्य, नाममाहात्म्य, उपदेश, सामाजिक दंभस्फोट, भजने, कीर्तनमहिमा, दिंड्या, लोकरंजकांची वैशिष्ट्यपूर्ण भारुडे, लोकगीते, ओव्या अशा विविध रचनाबंधांतून ही सारी संतगाथा अश्वत्थवृक्ष होऊन तिच्याकडे येणाऱ्या प्रत्येकाला थंडगार सावलीचा विसावा आणि तहानभूक शमविणारी रसाळ फळे देत आली आहे.

बहुसंख्य संतरचना ही गेय आहे. स्वरतालाशी प्रामाणिक आहे. नादमाधुर्यामुळे ती श्रोत्यांना मंत्रमुग्ध करते. समर्थांनी तिचा गौरव 'गायनविद्या' असा केला आहे. ते म्हणतात,

*'संगीत गायनीविद्या। सर्व सद्या मनोरथा।*
*विदेश पाहता नाही। धन्य ते गायनी कळा।।*
*आवडी सकळा लोका। प्रीतीने भजनी जनी।*
*इच्छिले पुरविती सर्वै। धन्य ते गायनी कळा।।*
*वेधिली सर्वही चित्ते। बोधिली लोकभाविके।*
*विख्यात सकळै लोकी। धन्य ते गायनी कळा।।*
*भक्तीची आवडी मोठी। करूणाकीर्तने बरी।*
*भक्तांची आवडी भक्ता। धन्य ते गायनी कळा।।'*

*(मराठी साहित्य महामंडळाच्या वर्धापनदिनी भोपाळ येथील परिसंवादातील भाषण)*

**रवीन्द्र भट**
फ्लॅट नं. २, 'सप्तश्रृंगी' अपार्टमेंट, १५११ ब, सदाशिव पेठ, पुणे ३०.



अनुक्रमणिका





# श्रीगणेश – अध्यात्म– दर्शन
## (लिपी आणि अक्षरांचा समन्वय)



**डॉ. सुशीला पाटील**

श्री. प. मा. पांडे यांचा 'श्रीगणेश अध्यात्म– दर्शन' हा ग्रंथ जुलै २००४ मध्ये प्रकाशित झाला. गणेशमूर्ती, लिपी आणि अक्षरे यांच्यातील एक आगळावेगळा समन्वय साधणारा हा मौलिक संशोधन– ग्रंथ अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. १९८९ मध्ये विदर्भ महाविद्यालयात 'वर्णांकित गणेश' यावर त्यांचे एक प्रदीर्घ व्याख्यान ऐकले होते. व्याख्यानाआरंभीचा त्यांचा तेव्हाचा दीर्घ ॐ कार अजूनही कानात घुमतो आहे. त्या भाषणाने गणेश, अंक, वर्ण आणि लिपी यांविषयीची जिज्ञासा जागी केली होती. तेव्हापासून अतृप्त राहिलेली ती जिज्ञासा या ग्रंथाने परिपूर्ण केली. पंधरा वर्षांपूर्वीच्या भाषणाने या विषयाचे सूतोवाच केले होते. आज या ग्रंथाने त्या विषयाची इतिश्री झाली.

एखाद्या विषयाने माणूस झपाटला गेला की, त्या विषयात तो खोलवर प्रवेश करतो, त्याच विषयाचे चिंतन-मनन करीत राहतो आणि त्यातून त्या विषयाचे अंतरंग सर्वांगाने उजळून टाकतो. श्री. प. मा. पांडे यांनी याच रीतीने श्रीगणेशाचे अंतरंग साधार स्पष्ट केले आहे. गणेश या देवतेबद्दल प्रत्येक भारतीयाच्या मनात आदर, भक्ती, आस्था अन् आत्मीयता आहे. 'श्रीगणेशाय नम:' म्हटल्याशिवाय आपले कोणतेच कार्य सुरू होत नाही आणि गणेशाच्या कृपेशिवाय ते सिद्धीला जात नाही, ही भारतीयांची श्रद्धा आहे. पण जनमानसांत स्थिरावलेल्या ह्या श्रद्धाभावनेत किती भाबडेपणा आहे, ते या ग्रंथावरून समजते. गणेशाच्या मागे केवढे वजनदार संदर्भ आहेत, ते पाहून आपल्या आजवरच्या गणेशविषयक अज्ञानाची लाज वाटू लागते.

आपणा साऱ्यांना परिचित असलेली गणेशमूर्ती लेखकाशी अनेक मुखांनी संवाद साधत राहते. तिचे बहुविध बोल लेखकाच्या कानामनापर्यंत पोहोचतात आणि त्यांच्या समर्थ भाषेत ते प्रभावीपणाने वाचकांपुढे येतात. उदाहरणार्थ – अथर्वशीर्षातले गणेशविषयक उल्लेख पाहून त्यांना अनेक संदर्भ आठवत राहतात. गणेशाचे सर्वव्यापी रूप आणि त्याचे सर्वेसर्वा सामर्थ्य त्यांच्या मनश्चक्षूंपुढे साकारते. 'त्वं वाङ्मय:' यावरून गणेशाच्या ठायी असणाऱ्या वाक्शक्तीचा ते वेध घेतात. त्यात वर्ण, लिपी, ध्वनी, भाषा या साऱ्यांचा ते विचार करतात.



अनुक्रमणिका






'अ' पासून 'ज्ञ' पर्यंतची वर्णमालिका त्यांना गणेशाच्या ठायी दिसते आणि त्यांना ज्ञानदेवांचा 'वर्णवपु' गणेश (ज्ञानेश्वरी १-३) आठवतो (पृ. ४०). सकलार्थाने मतीला उजळून टाकणाऱ्या 'वर्णवपु' गणेशाचे सामर्थ्य त्यांना जाणवते. ॐ या निर्गुण निराकाराच्या प्रतीकापासून (ॐ नमोजी आद्या।') तो अ, उ, म मिळून गणेशाचे पाय, उदर, मस्तक साकारल्याचे ज्ञानदेवांचे विवरण पाहताच अथर्ववेदातली गणेशाच्या पाय, उदर, मस्तक या संदर्भातली भव्य कल्पना आठवते. अथर्ववेदात गणेशाचे चरण म्हणजे भूमी, उदर म्हणजे अंतरिक्ष आणि शिर म्हणजे द्यौ असे वर्णन आहे. भूमी, अंतरिक्ष आणि आकाश व्यापणारा म्हणजे सर्वात्मक-सर्वव्यापी गणेश पाहून पुन्हा अथर्वशीर्षातले 'त्वमेव प्रत्यक्षं तत्त्वमसि। त्वमेव केवलं कर्तासि। त्वमेव केवलं धर्तासि। त्वमेव केवलं हर्तासि।' हे निर्देशही त्यांना स्मरतात. तसेच 'त्वं ब्रह्मा त्वं विष्णु: त्वं रुद्र:' हे वर्णनही त्यातून गवसलेल्या गणेशाला अधिक उजळून टाकतात. सृष्टीची उत्पत्ती-स्थिती-लय गणेशाच्या ठायीच ते पाहतात.

'सा एषा गणेशविद्या' या अथर्वशीर्षातील उल्लेखावरून 'गणेशविद्या' म्हणजे लेखनशास्त्राचा प्रारंभ हा बोध त्यांना होतो. त्या प्रकाशात पाणिनीने आपल्या अष्टाध्यायीत विवेचिलेली प्राचीन माहेश्वरी सूत्रे आकृतीच्या क्रमाने रचली, असे त्यांना जाणवते. त्यानुसार ध्वनींच्या गणांचे क्रम त्यांच्या ध्यानात येतात. अक्षरांचे आकृतिचित्र समजते आणि गणेशविद्येचे गूढ उलगडते. वर्णांना अनुस्वारांची जोड मिळत गेली की, बीजमंत्र सिद्ध होतात आणि मग गणेशाच्या वाङ्मयीन मूर्तीत त्यांना 'ॐ, ऱ्हीं, श्रीं, क्लीं व स्वस्तिक' या बीजमंत्रांचा साक्षात्कार होतो. समर्थ रामदासही गणेशाचे हेच रूप 'गणाधीश जो ईश सर्वा गुणांचा। मूळारंभ जो आरंभ तो निर्गुणाचा।' या शब्दांत स्मरताना त्यांना दिसतात.

गणेश हा जसा 'वर्णवपु' आहे, तसाच तो 'अंकवपु'ही (पृ. ४५) आहे. अंकाची सुरुवात ० पासून ९ पर्यंत आहे. बाकीचे आकडे यांचाच विस्तार आहे. ० ला फाटा काढला की १ होतो. 'पूर्णासी फाटा काढिजे। या नाव एक म्हणिजे।' असे संत एकनाथांचे वचनही आहे. एकापुढे शून्य लिहिले की, १० होतात. 'एक पुढे शून्य। त्या नांव दहावे लक्षण। आपले आपण पूजास्थान। विचित्र विंदान पूजेचे।' (एकनाथी भागवत, ११-१४३४). शून्य हे अव्यक्त परमात्म्याचे चिन्ह आहे. १ हे आत्म्याचे प्रतीक आहे. ९ हे जीवात्म्याचे चिन्ह आहे. 'दहा अंक आपली सत्यस्थिती दाखवतो. १ हे आत्मस्वरूप आपल्या ठिकाणी आहे. ० हे परमात्मास्वरूप आपल्या आजूबाजूला, पाठीशी सहायभूत म्हणून कार्य करीत आहे. १ या अंकातील फाटा कार्य करण्यापुरता आहे. त्याचे कार्य संपले की फाटा गळून तेथे शून्यच राहते. मग ते सर्वत्र असलेल्या शून्य तत्त्वात सहज मिळून जाते. म्हणून इकडे-तिकडे न भटकता आपले आपणच आत्मस्वरूप ओळखल्यास तीच भगवंताची पूजा होते' (पृ. ५०), असे एकनाथ सांगत असल्याचे लेखकाने नमूद केले आहे. हाच विचार ज्ञानदेवांनी 'अमृतानुभवा'त – 'एका एकू वेचला। शून्य बिंदू शून्य पुसिला। द्रष्टादृश्याचा निमाला। तैसे होय।' – या शब्दांत मांडला आहे आणि नेमका असाच आशय तुकोबांनीही











– 'एके दाखविले दहा। फाटा पहा पुसून। तुका म्हणे सरले ओझे। आता माझे सकळ।' – या रीतीने व्यक्त केला आहे. संतांच्या सहज वचनांत अंकांविषयीचे भान आणि अध्यात्म या दोहोंचाही प्रत्यय लेखकास येतो. सविस्तर विवेचनाने 'अंकवपु' गणेशात दडलेली गूढता उलगडली जाते.

'अथर्वशीर्षा'तल्या 'त्वं वाङ्मय:।' या चरणाप्रमाणेच 'त्वं चिन्मय:।' या शब्दांवरून अखिल ब्रह्मांडाला व्यापून असलेली चेतनाशक्ती त्यांना दिसते. आजच्या शास्त्रज्ञांची विज्ञानदृष्टीही आठवते. या जगात जड असे काहीच नाही. सर्व चैतन्यच आहे. कारण कोणत्याही जड वाटणाऱ्या बाबीचे विभाजन होता होता अणूपर्यंत जाता येते आणि अणूचे विभाजन शेवटी प्रचंड शक्तीत म्हणजे चैतन्यात होते. आजच्या वैज्ञानिकांची ही विज्ञानदृष्टी 'त्वं चिन्मय:।' या अर्थाला पुष्टी देणारीच आहे, असे श्री. पांडे ग्रंथाच्या भूमिकेत (पृ. ३३) नमूद करतात. शास्त्रज्ञ विश्वाच्या अंत:स्थ गाभ्यापर्यंत पोहोचतात. तेथील सुप्त नि सूक्ष्म शक्तिरूपाचा शोध घेतात. त्यांना चैतन्यतत्त्वाचा गाभा गवसतो. एक व्यापक भान त्यांना येते. नेमकी हीच दृष्टी 'ईशावास्योपनिषदा'तील – 'ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत्।' यातही असल्याचे श्री. पांडे सांगतात. 'अणोरणीयान् महतो महीयान्' यातही सर्वव्यापी एकमेव असे तेच चेतनारूप दिसते आणि अथर्वशीर्षातले 'त्वं चिन्मय:।' हे शब्द एका आगळ्यावेगळ्या आशयाने उजळून निघतात. श्री. पांडे यांनी अनेक ग्रंथांतील संदर्भ देऊन काढलेली अनुमाने वाचकांना नवी दृष्टी देणारी आणि विचारप्रवृत्त करणारी आहेत.

ऋग्वेदातीत गणपतिसूक्त, श्रीब्रह्मणस्पति सूक्त, विविध ग्रंथांतील सरस्वतीमहिमा, सद्गुरुमहिमा पाहून लेखकास 'श्रीगणेशाचे विराट दर्शन' घडते. 'अ' ते 'ज्ञ' पर्यंतची अक्षरे, स्वर, व्यंजने, बीजमंत्र, ० पासून ९ पर्यंतचे अंक, केवळ देवनागरीच नव्हे, तर अन्य भारतीय लिपी या साऱ्यांच्या द्वारा श्री गणेश अंगप्रत्यंगांतून आपले प्रबोधन करीत आहे, (पृ. ५४) असे श्री. पांडे यांना जाणवते.

तामीळ, तेलगु, कन्नड, मल्याळम या लिपींचा त्यांचा व्यासंग सखोल आहे. त्या-त्या लिपीतील वर्णांकित गणेश त्यांनी शोधला आहे. त्यांच्या प्रतिकृतीही येथे दिल्या आहेत. भारतामध्ये एकात्मभाव जागवण्याच्या दृष्टीने देवनागरी लिपीचे महत्त्व त्यांनी या ग्रंथात स्वतंत्रपणे उलगडून दाखवले आहे.

श्रीकृष्ण शर्मा यांनी उपनिषद्, महामंत्र, तत्त्वप्रकाशिनी आदी ग्रंथांच्या आधारे लिपीसंबंधी केलेले विवेचन आणि श्री. वाकणकर यांनी देवनागरी लिपीवर केलेले संशोधन याविषयीची माहितीही लेखकाने या ग्रंथात दिली आहे. पण श्री. प. मा. पांडे यांचे 'वर्णवपु' गणेशाविषयीचे संशोधन मात्र खास त्यांचे आहे. एखाद्या साक्षात्कारासारखे हे दर्शन त्यांना झाले आणि त्यांना घडलेले दर्शन त्यांनी अतिशय प्रभावी शब्दांत वाचकांपुढे ठेवले.

अंक, अक्षरे यांच्या उत्पत्तीचा मागोवा आजवर अनेक शास्त्रकारांनी, लिपिवेत्त्यांनी घेतला असेल; गणेशमूर्तीचा अभ्यासही आजपर्यंत अनेक भक्तभाविकांनी केला असेल; पण

अंक, अक्षरे, लिपी, वेदांपासूनचे वाङ्मय आणि गणेशमूर्ती यांची या ग्रंथात घातली गेलेली सांगड मात्र अपूर्वाईची वाटते. हे अत्यंत जटिल, कठीण, कंटाळवाणे अन् जिकिरीचे काम होते. पण श्री. प. मा. पांडे यांनी ते अतिशय निरलसतेने, आस्थेने, आत्मीयतेने आणि निष्ठेने तडीस नेले. गणेशविषयक एक उत्तम संशोधनग्रंथ सिद्धीस नेला, हे कौतुकास्पद आहे.

श्री. प. मा. पांडे हे शासकीय सेवेत पाटबंधारे खात्यात अभियंत्याच्या पदावर कार्यरत होते. त्यामुळे अंक, अक्षरे, गणेशमूर्ती, पारंपरिक प्राचीन साहित्य यांकडे वळण्याचे तसे कारणही नव्हते. पण बालकमंदिरात जाणाऱ्या आपल्या मुलाला आकडे नि अक्षरे शिकवण्याचे निमित्त झाले. शून्याला थोडीफार पुस्ती जोडली की वेगवेगळे आकडे तयार होतात. शून्य, अर्धवर्तुळ, उभा दांडा, यांच्या वेगवेगळ्या रचनांतून भिन्न भिन्न अक्षरे साकारतात, ही दृष्टी त्यांना आली. ज्ञानदेवांचा 'वर्णवपु' गणेश आठवला. सर्व उपलब्ध ग्रंथांतला गणेश दृष्टिपथात आला. यावर चिंतन करता करता अंक, अक्षरे, लिपी यांचा आणि गणेशाचा आकार यांच्यातील साम्याचा त्यांनी सूक्ष्मतेने नि सखोल अनुभव घेतला. अंक नि अक्षरे जणू त्यांना आपले हृद्गत सांगू लागली. गणेशमूर्ती आपले अंतरंगरहस्य त्यांच्या पुढ्यात उलगडून दाखवू लागली. एक अपूर्व साक्षात्कार त्यांना घडला. त्या साक्षात्काराबरोबरच लिपिशास्त्रावरील ग्रंथांचे अध्ययन त्यांनी केले. आपल्या विवेचनाशी ते ग्रंथ पडताळून पाहिले. वैदिक वाङ्मय, संत वाङ्मय, विविध क्षेत्रांतील विचारवंतांचे नि शास्त्रज्ञांचे तत्त्वचिंतन या साऱ्यांचे त्यांनी आतळ आकलन, अध्ययन, चिंतन, मनन केले आणि ही 'गणेशविद्या' त्यांना फळली. 'श्रीगणेश अध्यात्म दर्शन' घडले. या गणेशविद्येच्या अनुषंगाने जगण्याचे मूलभूत सिद्धांत त्यांनी स्वत: समजून घेतले आणि इतरांसाठी ते या ग्रंथातून मोकळे केले. गणेशाच्या संदर्भातील बहुविध आयाम स्पष्ट करणाऱ्या या ग्रंथाबद्दल श्री. प. मा पांडे यांचे मन:पूर्वक अभिनंदन! त्यांच्या यापुढील अध्ययन, चिंतन, मनन, संशोधन प्रक्रियेला उदंड सदिच्छा!

(**श्रीगणेश अध्यात्म– दर्शन,** परशराम माधव पांडे, मनोरमा प्रकाशन, मुंबई-१४, जुलै २००४, पृष्ठसंख्या ५२२, मूल्य ३०० रुपये)

**डॉ. सुशीला पाटील**

ज्ञानदीप, राठी नगर, अमरावती ४४४६०३

दूरध्वनी (०७२१) २६६१५४७

**अभिनंदन**

*डॉ. अविनाश आवळगांवकर यांची पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख म्हणून नियुक्ती झाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन!*



अनुक्रमणिका







# कार्यवृत्त

## शाखा : इचलकरंजी

### जिल्हास्तरीय कविसंमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा : इचलकरंजी तर्फे 'मसाप' च्या शताब्दी वर्षानिमित्त, तसेच श्रेष्ठ कवी केशवसुत स्मृति-शताब्दी वर्षाचे औचित्य साधून दि. ३ जानेवारी २००५ रोजी पं. बाळकृष्णबुवा स्मृति-मंदिर, इचलकरंजी येथे जिल्हास्तरीय उदयोन्मुख कवींच्या कविसंमेलनाचे आयोजन करण्यात आले. केंद्रीय कार्यकारिणीचे कार्यवाह डॉ. मिरदेव गायकवाड व मसाप परीक्षा विभाग प्रमुख डॉ. कल्याण इनामदार यांच्या मार्गदर्शन व परीक्षणाखाली केंद्रीय म. सा. प. तर्फे शताब्दी निमित्त पुणे येथे होणाऱ्या स्पर्धेसाठी स्पर्धकांची प्राथमिक फेरीही याच वेळी घेण्यात आली.

यावेळी पन्नासहून अधिक कवींनी 'काव्यवाचन' करून भरगच्च उपस्थितीत काव्य रसिकांकडून भरभरून दाद मिळविली.

**राजन मुठाणे**
कार्याध्यक्ष

## शाखा : भिवंडी

म.सा.प. भिवंडा शाखेचा तिसरा वर्धापन दिन ६ मे २००४ रोजी साजरा झाला. यावेळी प्रसिद्ध लेखिका, विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ व मुंबई विद्यापीठाच्या माजी कुलगुरू डॉ. सौ. स्नेहलता देशमुख यांचे 'संस्कारातून समाजनिर्मिती' या विषयावर व्याख्यान झाले.

**१ ऑगस्ट २००४** रोजी टिळक पुण्यतिथीनिमित्त टिळक मंदिर, वाचन मंदिर, भगिनी मंडळ व म. सा. प. भिवंडी शाखा या चार संस्थांतर्फे प्रा. वि. चिं. फडके यांचे 'आधुनिक मुंबईचे शिल्पकार– जगन्नाथ उर्फ नाना शंकरशेट' या विषयावर माहितीपूर्ण असे व्याख्यान झाले.

**२६ नोव्हेंबर २००४** रोजी "बोल बहिणेचे" हा कवयित्री बहिणाबाई चौधरी यांच्या आठवणी, कविता आणि गीतांवर आधारित कार्यक्रम 'शब्दांकित ग्रुप'ने सादर केला.

**११ फेब्रुवारी २००५** पुण्यातील प्रसिद्ध मंदिर संशोधक श्री. मो. के. कुंटे यांचे 'महाराष्ट्रातील मंदिरे कथा आणि व्यथा' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. १६,००० हून अधिक मंदिरांच्या स्थापत्य आणि कलात्मक शैलीचा आढावा घेऊन त्यांचा इतिहासही त्यांनी कथन केला. सदर कार्यक्रम टिळक वाचन मंदिराच्या सहकार्याने झाला.

**२० फेब्रुवारी २००५** जागतिक मराठी दिनानिमित्त झालेल्या कार्यक्रमात सहभागी

शिक्षक - विद्यार्थ्यांना पुस्तके देऊन गौरव करण्यात आला. विद्या बाळ यांच्या हस्ते ही बक्षिसे देण्यात आली. या कार्यक्रमाची प्रस्तावना सदस्या शुभांगी घनवटकर यांनी केली. अहवाल वाचन निर्मला लाहोटी यांनी केले. आभार प्रज्ञा जोशी यांनी मानले.

**२७ फेब्रुवारी २००५** 'जागतिक मराठी दिन'– म. सा. प. भिवंडी शाखा, नवभारत शाळा, प. रा. विद्यालय या तिन्ही संस्थांनी मिळून शालेय मुलांसाठी विविध मराठी साहित्याच्या रूपात साजरा केला.

**६ मे २००५** म. सा. प. भिवंडी शाखेचा चौथा वर्धापन दिवस– प्रसिद्ध विचारवंत व लेखिका श्रीमती विद्या बाळ, पुणे यांचे 'आजची स्त्री किती समर्थ आणि किती स्वतंत्र' या विषयावर चिंतनपूर्ण व्याख्यान झाले. त्यांनी आपले विचार अनुभवांच्या आधारे मांडले.

**निर्मला लाहोटी**
(कार्यवाह)

## शाखा : डोंबिवली

### तृतीय वर्ष बी. ए. मराठी विद्यार्थ्यांसाठी अभ्यास शिबिर.

पेंढरकर महाविद्यालय आणि म. सा. प. डोंबिवली यांच्या संयुक्त विद्यमाने तृतीय वर्ष बी. ए. मराठीच्या विद्यार्थ्यांसाठी परीक्षा प्रेरक अभ्यास शिबिराचे आयोजन १ व २ फेब्रुवारी २००५ मध्ये पेंढरकर महाविद्यालयाच्या भव्य सभागृहात पार पडले.

महाविद्यालयाच्यावतीने डॉ. प्रा. मंगला सिन्नरकर व परिषदेच्यावतीने डॉ. प्रा. सौ. मीनाक्षी ब्रह्मे यांची समन्वय समिती स्थापन करण्यात आली होती. त्यांनी आपले काम चोख बजावले.

### दि. ११ डिसेंबर २००४

"क्रांतिकारक हा जन्मावा लागतो, म्हणजे त्याचे कार्य आजन्म टिकून राहाते." अशा प्रकारचे भाष्य अधिकारवाणीने प्रा. डॉ. मंगला सिन्नरकर या आधुनिक काव्याचे प्रणेते कवी केशवसुत यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ आयोजित केलेल्या कार्यक्रमात पटवून देत होत्या. वक्त्याच्या ठायी असणारे सर्व गुण त्यांच्या प्रदीर्घ चाललेल्या भाषणात लपून राहात नव्हते. श्रोतृवृंद रमविण्याची कला त्यांच्याकडे ओतप्रोत भरलेली आहे.

**प्रा. प्रभात शिरसेकर.**
कार्यवाह.

## शाखा : जळगाव

.यावल - म. सा. प. शाखा जळगाव व ना. मा. सार्वजनिक वाचनालय यावल यांच्या विद्यमाने वाचनालयाच्या सभागृहात परिषदेचे अध्यक्ष कवी नारायण शिरसाळे यांच्या अध्यक्षतेखाली स्वागतगीत व दीप-प्रज्वलनाने कवी संमेलनास प्रारंभ झाला. यावेळी शाल,

श्रीफळ व गुलाबपुष्प देऊन श्री. भागवत कापसे आणि पदाधिकाऱ्यांनी स्वागत केले. ज्येष्ठ कवी प्रा. भास्कर पाटील, प्रा. विमल वाणी, कवी ज्ञानेश मोरे, कवी प्रभाकर महाजन, प्रा. वा. ना. आंधळे यांनी आपल्या कविता सादर केल्या. कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांची जयंती व मराठी राजभाषा दिनाच्या निमित्ताने कुसुमाग्रजांच्या काही कवितांचे वाचन झाले. तीन प्रमुख बाबींमुळे या कार्यक्रमास विशेष महत्त्व आले. यावेळी प्रकाशचंद्र तेलंग, प्रल्हाद खरे, प्रा. पी. बी. चौधरी, भास्कर पाटील यांनीही काव्यवाचन केले. प्रा. दिनेश पाटील यांनी संचलन केले व आभार मानले.

अध्यक्ष

जळगाव.

**दि. २६-९-२००४**

महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा, जळगाव आणि 'पान फुलं प्रकाशन' यांच्या संयुक्तविद्यमाने साहित्यिक जगन्नाथ धनसिंग यांच्या 'गुजरी तोडी (म्हणी)' या पुस्तकाचे प्रकाशन रेल. ता. धरणगाव येथे दि. २६-९-२००४ ला जळगाव आकाशवाणीचे निदेशक माननीय अनिल देशमुख यांच्या हस्ते करण्यात आले. अध्यक्षस्थानी परिषदेचे अध्यक्ष नारायण शिरसाळे होते. प्रास्ताविक आणि सूत्रसंचालन कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील यांनी केले.

**प्रा. दिनेश पाटील.**

कार्याध्यक्ष

## शाखा : धुळे

**५ नोव्हेंबर २००४** कै. प्रा. अनंतराव पाटील स्मृतिदिनानिमित्त ज्येष्ठ साहित्यिक मा. डॉ. र. बा. मंचरकर यांचे 'समर्पणमयी सीता' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. अध्यक्षस्थानी कविवर्य प्रा. पुरुषोत्तम पाटील हे होते.

**३० डिसेंबर २००४** दलित मित्र कै. प्राचार्य सी. आय. मोरे स्मृतिप्रीत्यर्थ अहिराणी कथाकथनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. अध्यक्षस्थानी प्रा. रविकिरण झोळ (दोंडाईचा) हे होते.

**२४ जानेवारी २००५** कै. भाऊ देशपांडे स्मृतिदिनानिमित्त धुळ्यातील प्राचार्य सदाशिवराव माळी, प्राचार्य पुरुषोत्तम पाटील, श्री. यादव खैरनार, प्रा. डॉ. कृष्णा पोतदार, मा. श्रीमती हेमा जावडेकर या साहित्यिकांचा 'साहित्यिकांच्या अविस्मरणीय आठवणी' हा कार्यक्रम आयोजित केला होता. अध्यक्षस्थानी मा. आनंदरावजी साळुंखे हे होते.

## शाखा : अंबरनाथ (जि. ठाणे)

महाराष्ट्र साहित्य परिषद, अंबरनाथ शाखेच्या वतीने साहित्य परिषदेच्या शताब्दी निमित्ताने 'कला-कौस्तुभ शिवमंदिर, अंबरनाथ' हा भव्य ग्रंथ प्रकल्प आकारास येत आहे. अंबरनाथचे ९५० वर्षांचे शिवमंदिर हा एक जागतिक मौल्यवान ठेवा आहे. या ग्रंथामध्ये महाराष्ट्रातील विद्वान इतिहास संशोधक, शिलाहार राजवट व त्यांनी बांधलेले शिवमंदिर यावर नवा प्रकाश टाकणार आहेत.

याच ग्रंथातील एक लेखक व महाराष्ट्रातील मंदिर रचनाशास्त्राचे, मूर्ती विज्ञानाचे गाढे अभ्यासक गुरुवर्य डॉ. गो. ब. देगलुरकर यांचे व्याख्यान दि. २२-०५-०५ रोजी अंबरनाथ येथील हेरंब मंदिराच्या सभामंडपात आयोजित करण्यात आले होते.

या प्रसंगी अध्यक्ष अरुण मैड यांनी वरील प्रकल्पाची योजना आपल्या प्रास्ताविकात मांडली. प्रा. सौ. रेखा मैड यांनी सूत्रसंचालन केले. कार्यवाह - महेंद्र पाटील यांनी आभार प्रदर्शन केले. सौ. अजिता फेगडे यांनी म्हटलेल्या सुस्वर पसायदानाने कार्यक्रमाची सांगता झाली.

**अरुण ब. मैड**
अध्यक्ष

## शाखा : अहमदनगर

१) केशवसुत जन्मशताब्दी वर्षानिमित्त काव्यस्पर्धा
उपस्थिती - श्री. मिरदेव गायकवाड, श्री. कल्याण इनामदार.

२) संमेलनाध्यक्ष प्रा. रा. ग. जाधव यांचा सत्कार.

३) कुसुमाग्रजांच्या कवितांवर आधारित कार्यक्रम.

४) कवी निरंजन उजागरे यांच्या कवितांवर आधारित कार्यक्रम -
अध्यक्ष प्रा. सुधीर शर्मा.

५) शुद्धलेखन स्पर्धा.

६) आ. श्री. यशवंतराव गडाख पा. यांच्या 'अर्धविराम' चा पुणे विद्यापीठाने अभ्यासक्रमात समावेश केला. त्यानिमित्त डॉ. सुधा कांकरिया (अध्यक्षा) यांच्या हस्ते सत्कार.

७) दि. १३ मे २००५ रोजी म. सा. प. शताब्दी शुभारंभाच्या निमित्ताने अहमदनगरचे माजी अध्यक्ष डॉ. ह. कि. तोरडमल, श्री. मु. म. कोटस्थाने, श्री. ब. सो. सोळंकी. प्रा. जवाहर मुथा, श्री. डी. एम. कांबळे, डॉ. लीला गोविलकर आणि पत्रकार श्री. महादेव कुलकर्णी यांचा सत्कार नगर शाखेच्या अध्यक्षा डॉ. सुधा कांकरिया यांच्या हस्ते झाला. दिवंगत अध्यक्ष कॉ. भास्करराव जाधव, ना. धों. नानल आणि कै. मामासाहेब वडझडिकर

यांच्या निकटवर्तीयांनी सत्कार स्वीकारला. या कार्यक्रमास प्रसिद्ध कवी श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली यांना डी. लिट. पदवी मिळाल्याबद्दल आणि कवी दत्ता हलसगीकर यांचा म. सा. प. काव्यपुरस्कार मिळाल्याबद्दल विशेष निमंत्रित करून सत्कार करण्यात आला. या कार्यक्रमाच्या यशस्वितेत डॉ. सुधा कांकरिया (अध्यक्ष), डॉ. सु. प्र. कुलकर्णी, श्री. चंद्रकात पालवे, प्रा. मेधा काळे, डॉ. क्रांतीकला अनभुले, डॉ. देवळालीकर, सौ. अमृता खाकुर्डीकर इ. चा सहभाग होता.

**किशोर मरकड**
कार्यवाह.

## पुणे

**दि. २० मार्च :** कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त श्रीमती सुषमा दाते यांच्या सुगम संगीताचा कार्यक्रम झाला. भावगीते, नाट्यगीते, भक्तिगीते यांद्वारे त्यांनी रसिकांना अभिजात संगीत गायनाचा आनंद मिळवून दिला. या प्रसंगी कार्याध्यक्ष गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले. नंदा सुर्वे यांनी आभार मानले. डॉ. मिरदेव गायकवाड यांनी संपूर्ण कार्यक्रमाचे निवेदन केले.

**दि. ५ मे :** बालकवी स्मृतिदिनानिमित्त कवयित्रींच्या काव्यवाचनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. अध्यक्षस्थानी डॉ. अश्विनी धोंगडे होत्या. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी प्रास्ताविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले.

**दि. २७/२८ मे :** रोजी म. सा. प. च्या शताब्दीचा शुभारंभ करण्यात आला. त्याचा थोडक्यात आढावा पत्रिका संपादक डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी या अंकात घेतला आहे.

**दि. ३ जून :** डॉ. नागनाथ कोतापल्ले यांची डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून नियुक्ती झाल्याबद्दल परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. आंतरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक डॉ. वसंतराव गोवारीकर या प्रसंगी प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. प्रमुख कार्यवाह रवीन्द्र भट यांनी या सत्कारामागील भूमिका सांगून सर्वांचे यथोचित स्वागत केले. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी या सत्काराचे औचित्य विशद करून परिषदेतर्फे डॉ. कोतापल्ले यांना शुभेच्छा दिल्या. परिषदेचे अध्यक्ष राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते डॉ. वसंतराव गोवारीकर यांचाही सत्कार करण्यात आला. या सत्कार समारंभास शिक्षणक्षेत्रातील अनेकजण उपस्थित होते.

**डॉ. मिरदेव गायकवाड**
स्थानिक कार्यवाह.

❑

## १ एप्रिल २००४ पासून आलेल्या देणग्यांच्या नोंदी

| अनु. क्र. | दिनांक | नाव | रक्कम |
|---|---|---|---|
| १) | ७.४.२००४ | श्री. मधुकर पटवर्धन (श्रीमती प्रभा पटवर्धन) | १,५०,०००/- |
| २) | ७.४.२००४ | श्री. ग. प्र. प्रधान | ६,०००/- |
| ३) | २२.५.२००४ | डॉ. सु. प्र. कुलकर्णी | ८५०/- |
| | | | ५,०००/- |
| ४) | ७.६.२००४ | श्री. मधुकर ना. गोगटे | ६,०००/- |
| ५) | १८.६.२००४ | दि महाराष्ट्र एक्झीब्युटर्स अॅण्ड ट्रस्टी कं. लि. | ५,०००/- |
| ६) | २२.६.२००४ | श्री. तुळशीदास रा. कामत | ५००/- |
| ७) | २८.६.२००४ | डॉ. अ. पां. दाणी | ३५०/- |
| ८) | १.७.२००४ | श्री. गं. वि. नेर्लेकर | १,०००/- |
| | | | ५,०००/- |
| | | | ५,०००/- |
| ९) | ६.७.२००४ | डॉ. रमेश गोडबोले | १०,०००/- |
| १०) | १२.७.२००४ | प्रा. वसंत दीक्षित | ५,०००/- |
| ११) | ३१.७.२००४ | डॉ. गं. ना. जोगळेकर | १०,०००/- |
| १२) | ६.८.२००४ | श्री. राम वझे | ५००/- |
| १३) | १०.८.२००४ | प्रा. के. ज. पुरोहित | २,०५१/- |
| १४) | १३.१२.२००४ | डॉ. गं. ना. जोगळेकर | २५,०००/- |
| १५) | २३.१२.२००४ | मा. श्री. मोहन धारिया | २५१/- |
| १६) | २०.२.२००५ | प्रा. शा. म. पाटील | १,००१/- |
| १७) | २२.२.२००५ | डॉ. हरिभाऊ रं. कुलकर्णी | १,००१/- |
| १८) | २२.२.२००५ | प्रा. शरद उमराणी | १,०००/- |
| १९) | २२.२.२००५ | डॉ. सतीश देसाई | ३,०००/- |
| २०) | २३.२.२००५ | डॉ. के. रं. शिरवाडकर | ३००/- |
| २१) | ३.३.२००५ | मा. न्या. प्रतापराव बेहेरे | २५,०००/- |

## नवीन आजीव सभासदांची यादी

१. जोशी मिलिंद गोविंदराव, पुणे
२. मोहिते पाटील रणजितसिंह विजयसिंह,शंकरनगर
३. मोहिते पाटील उदयसिंह शंकरराव, शंकरनगर
४. मोहिते पाटील धैर्यशील राजसिंह, शंकरनगर
५. मोहिते पाटील शीतलदेवी धैर्यशील, शंकरनगर
६. मोहिते पाटील मदनसिंह शंकरराव, शंकरनगर
७. मोहिते पाटील अर्जुनसिंह मदनसिंह, शंकरनगर
८. मोहिते पाटील संग्रामसिंह जयसिंह, शंकरनगर
९. मोहिते पाटील ऋतुजादेवी संग्रामसिंह, शंकरनगर
१०. माने विक्रम दिनकरराव, शंकरनगर
११. खराडे जीवन संभाजीराव, शंकरनगर
१२. खराडे नितीन जयसिंगराव, यशवंतनगर
१३. बारबोले दत्तात्रय नागनाथ, संग्रामनगर
१४. आवाड विश्वनाथ महादेव, अकलूज
१५. जाधव उल्हास माणिक, स्वरूपनगर
१६. राऊत श्रीकांत सुरेश, अकलूज
१७. दगडे धर्मराज राजाराम, अकलूज
१८. गायकवाड मृणाल शंकरराव, यशवंतनगर
१९. काकडे राजेंद्र तुकाराम, शंकरनगर
२०. गंभीरे अण्णासाहेब विनायक, उंबरे
२१. कोरटकर बाळासाहेब बबनराव, शंकरनगर
२२. शेटे हनुमंत बाळकृष्ण, शंकरनगर
२३. जोशी प्रमोद रामचंद्र, शंकरनगर
२४. नवले अशोक मारुती, माळशिरस
२५. वढारे सुलभा पांडुरंग, अकलूज
२६. शेटे उत्कर्ष रामलिंग, अकलूज
२७. पाटील विश्वनाथ रंगराव, अकलूज
२८. भोसले हनुमंत दगडू, शंकरनगर
२९. सतताळे रत्नाकर मारुती, अकलूज
३०. पवार हनुमंत मारुती, निमगाव
३१. गायकवाड भारत काशिनाथ, वेळापूर
३२. शिंदे शिवदास माधव, यशवंतनगर

३३. बनकर नितीन तुकाराम, अकलूज
३४. नलवडे पांडुरंग कृष्णा, शंकरनगर
३५. शेख शब्बीर हनीफ, यशवंतनगर
३६. गुजर दिलीप नामदेव, यशवंतनगर
३७. मुळे भीमराव केशव, यशवंतनगर
३८. मोरे एकनाथ अप्पा, यशवंतनगर
३९. अष्टुलकर शिरीष नरसिंह, यशवंतनगर
४०. दळवी सुभाष रामलिंग, अकलूज
४१. उरवणे सुहास जयराम, अकलूज
४२. जाधव अनिल राजाराम, अकलूज
४३. रामदासी प्रेमनाथ रघुनाथ, अकलूज
४४. जगताप प्रशांत रघुनाथ, अकलूज
४५. गायकवाड मिलिंद श्रीपती, अकलूज
४६. ताटे संतोष मोहनराव, अकलूज
४७. फुले अमोल कृष्णात, अकलूज
४८. थोरात विनोद जगन्नाथ, अकलूज
४९. पलंगे नितीन भालचंद्र, अकलूज
५०. क्षीरसागर प्रकाश तुकाराम, अकलूज
५१. लिके दत्तात्रय तुकाराम, अकलूज
५२. मोहिते पाटील जयसिंह शंकरराव, अकलूज
५३. मोहिते पाटील विजयसिंह शंकरराव, अकलूज
५४. मोहिते पाटील स्वयंप्रभादेवी उदयसिंह, अकलूज
५५. मोहिते पाटील राजसिंह शंकरराव, अकलूज
५६. मोहिते पाटील प्रतापसिंह शंकरराव, अकलूज
५७. मोहिते पाटील पद्मजादेवी प्रतापसिंह, अकलूज
५८. गोगटे वामन वासुदेव, धुळे
५९. पत्की सुलेखा सुभाष, पुणे
६०. कांबळे सुनयना प्रभाकर, ठाणे
६१. देशपांडे गौरी संजय, ठाणे
६२. सोळांकुरकर सतीश, कळवा
६३. रेगे प्रदीप दत्ताराम, पुणे
६४. कांबळे ज्ञानेश्वर रामचंद्र, सोलापूर
६५. जाधव लक्ष्मण सिद्राम, सोलापूर
६६. कुलकर्णी प्राची दत्तात्रय, पुणे

६७. चौधरी उदय गौरीशंकर, जळगाव
६८. मंडलीक विश्वास चिमासाहेब, इस्लामपूर
६९. हसबनीस सदाशिव विनायक, शिराळा
७०. परळकर स्वाती मारुती, पुणे
७१. पाटील साहेबराव शिवराम, जळगाव
७२. धुप्पड माया दिलीप, जळगाव
७३. सुभेदार स्वामिता संजय, पुणे
७४. तापकीर श्रीकांत नारायण, पुणे
७५. गरदे आनंद माधव, कोलंबिया

## पारितोषिके

**१९ जानेवारी २००४ - चिं. वि. जोशी पारितोषिक.**

कॉंटिनेन्टल प्रकाशनाने पुरस्कृत केलेले उत्कृष्ट काव्यसंग्रहासाठी कुसुमाग्रज पारितोषिक देण्यात येते. कवीला रु. १५००/- व त्या कवितासंग्रहाच्या प्रकाशकाला रु. १०००/- असे पारितोषिकाचे स्वरूप असते.

यावर्षी डॉ. सुलभा हेर्लेकर यांच्या 'शुभ सकाळ' या कवितासंग्रहाला हे पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. मोहन धारिया होते. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. परीक्षक म्हणून प्रदीप निफाडकर व अंजली कुलकर्णी यांनी काम पाहिले. परीक्षक म्हणून अंजली कुलकर्णी यांचे भाषण झाले.

या दिवशी श्री. मोहन धारिया यांचा त्यांना 'पद्मविभूषण' गौरव प्राप्त झाल्याबद्दल परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला.

**२९ मार्च २००४ - कै. शं. ना. जोशी पारितोषिक.**

थोर इतिहास संशोधक कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिदिनानिमित्त ऐतिहासिक, सामाजिक, सांस्कृतिक विषयांवरील दर्जेदार ग्रंथाला पारितोषिक देण्यात येते. रु. ५०००/- असे पारितोषिकाचे स्वरूप आहे.

यावर्षी लक्ष्मीकांत देशमुख यांच्या 'इन्किलाब विरुद्ध जिहाद' या ग्रंथाला हे पारितोषिक देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर होते. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्ताविक केले. डॉ. मिरदेव गायकवाड यांनी आभार मानले. परीक्षक म्हणून नंदा सुर्वे व रवींद्र भट यांनी काम पाहिले. परीक्षकांच्यावतीने रवींद्र भट यांचे भाषण झाले.

नंदा सुर्वे
कार्यवाह.











## 'शाहू' चरित्रात्मक कादंबरी.

(अल्पपरिचय)

कोल्हापूरचे एक कवी, गीतकार, गझलकार श्रीराम ग. पचिंद्रे यांनी काव्यलेखनाबरोबरच गद्यलेखनही केलेले आहे. 'मुलाखत आणि शब्दांकन' (१९९९) व 'भ्रष्टासुराच्या कथा' (२००१) ही त्यांची गद्यलेखनाची दोन प्रकाशित पुस्तके होत. आता गद्यलेखनाचे तिसरे पुस्तक त्यांच्या नावावर जमा झाले आहे. 'शाहू' हे ते तिसरे गद्यलेखनाचे पुस्तक असून ते चरित्रात्मक कादंबरी या प्रकारात मोडणारे आहे.

खरे तर राजर्षी छत्रपती शाहू महाराजांवर चरित्रात्मक गद्यलेखन खूप झालेले आहे व ते अभ्यासपूर्ण, संशोधनपूर्ण असे आहे. ललितसाहित्यकृती अशा स्वरूपात मात्र फार कमी लेखन झालेले आहे. कादंबरीपुरते बोलायचे तर राजर्षी शाहूंवर कादंबरी लिहिण्याचा संकल्प 'मृत्युंजय'कार शिवाजी सावंत, ग्रामीण साहित्यिक शंकर पाटील व दलितमित्र राम शिर्के यांनी सोडलेला होता; परंतु तो त्यांना पूर्ण करता आलेला नाही. राजर्षी शाहूंवर पहिली मराठी कादंबरी लिहिण्याचा मान त्यामुळे श्रीराम पचिंद्रे यांनाच द्यावा लागतो. अशी ही कादंबरी लवकरच हिंदीत व इंग्रजीतही अनुवादित होत आहे.

२०४ पृष्ठसंख्येची ही कादंबरी एकूण २५ भागांमध्ये विभागलेली आहे. कादंबरी सुरू होण्यापूर्वी अठरा पृष्ठांचा अन्य मजकूर असून त्यात अर्पणपत्रिका, कादंबरीकाराचे मनोगत, प्रकाशकाचे मनोगत, कादंबरीकाराची 'शाहू' या शीर्षकाची गझलेच्या आकृतीबंधातील कविता आदींचा अंतर्भाव आहे. कादंबरीच्या अखेरीस संदर्भग्रंथ, साधने, राजर्षी शाहूंचा जीवनपट, लेखक परिचय आदी मजकूर आहे. कादंबरीच्या मुखपृष्ठावर राजर्षी शाहूंचे अखेरच्या काळातील छायाचित्र आहे. तर मलपृष्ठावर प्रकाशक डॉ. नरेशचंद्र काठोळे (अमरावती) यांचे मनोगत आहे. त्यात अमरावतीच्या विदर्भ सत्यशोधक मंडळास ही कादंबरी प्रकाशित करण्याची संधी मिळाल्याबद्दल या मंडळाचे सचिव असलेल्या डॉ. काठोळे यांनी समाधान व्यक्त केले आहे.

कादंबरीकार श्रीराम पचिंद्रे यांनी कादंबरीच्या प्रारंभी 'वाचकांच्या सेवेसी' या शीर्षकाखाली जे आपले मनोगत दिले आहे त्यातून या कादंबरीच्या निर्मितीप्रक्रियेवर प्रकाश पडतो. पचिंद्रे यांच्या विद्यार्थीदशेत 'विद्यापीठ सोसायटी'चे एक संस्थापक गं. य. दीक्षित (गुरुजी) यांच्याकडून त्यांना राजर्षी शाहूंविषयीच्या अनेक गोष्टी ऐकायला मिळाल्या होत्या. पुढे डॉ. काठोळे यांनी 'राजर्षि शाहूंविषयी काहीतरी लिहा' असा आग्रह केल्यानंतर इ.स. २००१ मध्ये श्री. पचिंद्रे यांनी कादंबरीलेखनाच्या कामास प्रारंभ केला. अखेरीस २६ जुलै २००४ रोजी ही कादंबरी अमरावती येथे शाहू जयंतीदिवशी समारंभपूर्वक प्रकाशित करण्यात आली.

राजर्षी शाहूंचे व्यक्तिमत्त्व, त्यांचे जीवन व त्यांचे कार्य या सर्वांना कादंबरीत पकडायचे म्हणजे कादंबरीकार म्हणतो त्याप्रमाणे 'शिवधनुष्य पेलण्यापेक्षाही अवघड असे कार्य' तर



अनुक्रमणिका








खरेच, परंतु हे कार्य पचिंद्रे यांनी तडीस नेले, हे विशेष! शिवाजी सावंत, शंकर पाटील, राम शिर्के या ज्येष्ठ लेखकांच्या प्रयत्नांच्या पार्श्वभूमीवर ही गोष्ट महत्त्वपूर्ण ठरते. पचिंद्रे यांचा कादंबरीलेखनाचा हा पहिलाच प्रयत्न होय. मात्र, त्यात त्यांना खूपच यश प्राप्त करता आले आहे. राजर्षी शाहूंचे व्यक्तिचित्रण करताना पचिंद्रे यांनी त्यांच्याविषयीच्या अफवांचाही विचार केला आहे, इतकेच नव्हे तर या अफवा योग्य त्या पुराव्यांसह खोडूनही काढल्या आहेत. राजर्षी शाहूंचा कोणताही पैलू कादंबरीत चित्रित व्हावयाचा राहून गेलेला नाही. सनातनी प्रवृत्तींविरुद्ध संघर्ष करणारे शाहू, दीनदलितांना न्याय मिळवून देणारे शाहू, समतेचा विचार रुजावा म्हणून दूरदृष्टीने प्रयत्न करणारे शाहू, इंग्रजांच्या विरोधात स्वातंत्र्यप्रेमींना आतून मदत करणारे शाहू हे त्यांचे महत्त्वाचे पैलू कादंबरीकाराने नेमकेपणाने व नेटकेपणाने चित्रित केलेले आहेत. पचिंद्रे हे बहुविध जबाबदारी सांभाळणारे वरिष्ठ पत्रकार असल्याने त्यांना कादंबरीलेखनासाठी पुरेसा वेळ, पुरेसा निवांतपणा मिळाला असण्याची शक्यता कमी वाटते. तसे जर झाले असते, तर त्यांची 'शाहू' ही कादंबरी अजून दर्जेदार, अजून कसदार, अजून निर्दोष निश्चितच झाली असती. परंतु एक गोष्ट मात्र निश्चित आहे की मराठी चरित्रात्मक कादंबरीवाङ्मयात या कादंबरीने एक मोलाची भर पडली आहे व त्याबद्दल कादंबरीकार श्रीराम ग. पचिंद्रे यांना धन्यवाद दिले पाहिजेत.

('शाहू' : श्रीराम ग. पचिंद्रे, विदर्भ सत्यशोधक मंडळ, अमरावती, प्रथमावृत्ती : २६ जुलै २००४. पृष्ठे : २२५, मूल्य : रु. ४००/-)

**डॉ. अविनाश सांगोलकर**
प्रपाठक, मराठी विभाग प्रमुख,
रा. छ. शाहू कॉलेज, कोल्हापूर.

---

## साभार पोच

**छत्रपती शिवाजी महाराजांच्या जन्मतिथीचा वाद :** ज्ञानेश्वर हावरे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ २८

**देवदासी : शोध आणि बोध :** वसंत राजस, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १०४

**आंबेडकरवाद : तत्त्व आणि व्यवहार :** रावसाहेब कसबे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ७६

**गावकुसाबाहेरचं जिणं :** गंगाधर लांडगे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १५४

**रिझर्वेशन पॉलिसी फॉर प्रायव्हेट सेक्टर व्हाय ॲण्ड हाऊ :** सुकदेव थोरात, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२

**मराठी दलित कादंबरीची अभिनव वाटचाल :** सुशीला ढगे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ २१६

**गांधीजींची ओळख :** पन्नालाल सुराणा, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ २८

**मुस्लिमांचे लाड :** गोविंद पानसरे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४०

**कुंभमेळ्यात भैरू :** उत्तम कांबळी, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ११२

**राजर्षी शाहू महाराज आणि वेदोक्त प्रकरण :** उत्तम कांबळे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४०

**विसावे शतक आणि भारतातील समता विचार :** भा. वि. भोळे, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ १२८

**वामनराव पै यांची जीवन-विद्या : एक आकलन :** अण्णा पेडणेकर, सुगावा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३६

**सिद्धार्थ गौतम :** झुंबरलाल कांबळे, पृष्ठ ५८

**किमया लेसर किरण, प्लॅस्टिक, फायबर ग्लासची. मनोरंजक शास्त्रीय लेख :** मनोहर थत्ते, मनोहर प्रकाशन पुणे, पृष्ठ १४८

**चित्रायन :** साधना बहुलकर, विश्व संवाद केंद्र, मुंबई, पृष्ठ १९०

**गायधनींची कविता : चिकित्सा व आकलन :** ईश्वर सोमनाथे, तनुजा प्रकाशन, नागपूर

**कथा (तेलगीच्या विळख्यांची) :** अरुण हरकारे, कुलस्वामिनी प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठ १२८

**सरगम :** अरुण पुरोहित, शोभा प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ११२

**लाऊक :** विजय कुमार मिठे, कीर्ती प्रकाशन औरंगाबाद, पृष्ठ ११०

**मुक्तगंध :** बळवंत चित्रुक, माउली प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठ ४८

**मानुषी :** मानसी लाटकर, प्रकाशक राकेश साळुंखे, सातारा, पृष्ठ ९६

**लेणे प्रतिभेचे :** गीता जोशी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२४

**नकळत सारे घडले :** शेखर ढवळीकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ १२४

**रिमोट कंट्रोल :** शेखर ढवळीकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८४

**माझी कॉर्पोरेट यात्रा :** रमेश जोशी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ २१६

**नातिचरामि :** मेघना पेठे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३१६

**यशोधन :** संकलन विनायक पाटील, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ८६

**माझं इवलं हस्ताक्षर :** संजय चौधरी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ५८

**ड्रॅगन जागा झाल्यावर :** अरुण साधू, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ४१६

**मुक्काम आर्मी पोस्ट ऑफीस :** वैदेही देशपांडे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठ ११८

**मराठी सोपी ज्ञानेश्वरी :** अरुण नासिककर, व्ही. आय. पी. प्रकाशन, नासिक, पृष्ठ ५३२

**आठवतं ना तुला :** प्रमोद कर्नाड, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठ २१०

**सत्त्व शोधाच्या कविता :** एकनाथ पाटील, क्रांतदर्शी प्रकाशन, आष्टा, पृष्ठ ७६

**ओंजळीतील आभाळ :** संजीवनी बोकील, उन्मेष प्रकाशन, पुणे, पृष्ठ १२८

**मोठ्ठं व्हायचं कसं? :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, अमरावती, पृष्ठ ३२

**नवी बडबडगीतं :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, अमरावती, पृष्ठ ३२
**अनंत गणेश फंदी ऊर्फ तिसरे फंदी यांच्या निवडक कविता :** मधुकर काशिनाथ मोढे, अक्षय प्रकाशन, संगमनेर, पृष्ठ ६८
**चांदणलेलं आभाळ :** संजीवनी तोफखाने, चिन्मय प्रकाशन, चिंचवड, पृष्ठ ७०
**कवितेचा कॅन्व्हास :** चित्रसेन शबाब, चेक प्रकाशन मडगाव, गोवा, पृष्ठ ११४
**जिताड :** दिलीप भावसार, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ २००
**भालचंद्र नेमाडे यांची समीक्षा :** किशोर सानप, साकेत प्रकाशन प्रा. लि. औरंगाबाद, पृष्ठ २००
**तेच लोक होते :** वसंत मुरदारे, संवेदना प्रकाशन, चिंचवड, पृष्ठ ६४
**घरपण :** अप्पासाहेब खोत, निर्मोही प्रकाशन, पुणे, पृष्ठ १६०
**मरणादरी :** अप्पासाहेब खोत, निर्मोही प्रकाशन, पुणे, पृष्ठ १४४
हे आहेत.
**एक सूर माझा एक सारंगीचा :** पंडित रामनारायण, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठ १३२
**बॅरिस्टरचं कार्टं :** हिम्मतराव बावस्कर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठ २६२
**ह. मो. मराठे यांच्या निवडक कथा :** संपादक दीपक घारे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठ १६४
**लेगॉसचे दिवस :** शोभा बोंद्रे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठ १९८
**ही 'श्री' ची इच्छा :** श्रीनिवास ठाणेकर, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठ १९८
**स्त्री मुक्ती चळवळ आणि वृत्तपत्रांचा सहभाग :** मंगला खिंवसरा, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ १६०
**गुलजार :** निर्मलकुमार लिमये, यशराज प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ७०
**कंदील आणि काळोख :** भाऊ विश, अक्षर चळवळ प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ६२
**मन वढाय वढाय :** रमेश चिल्ले, प्राजक्ता प्रकाशन, पुणे
**दामू देवबाग्याची दुनिया :** यशवंत रायकर, अयपा प्रकाशन, विरार, पृष्ठ ३६६
**जीवन :** राजेंद्र वाघ, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठ ३२
**ऐलान :** सुनील सावंत, वंदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ४८
**सूर्य दिसत राहील तोपर्यंत :** सुनील सावंत, वंदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठ १३२
**स्वातंत्र्याची हाक :** सुनील सावंत, वंदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठ ४०
**त्रिवेणी :** श्याम फरांदे, शब्दरंग प्रकाशन, पुणे, पृष्ठ ६०
**घ्यावे आभाळ कवेत :** प्रकाश काळे, पृष्ठ १००
**राजा रविवर्मा :** बा. ग. पवार, मातृभूमी प्रकाशन, पुणे, पृष्ठ १०४
**ऋशाला हवा तो चप्पा :** बाळकृष्ण खरे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठ ८०



**राजहंस प्रकाशन** १०२५ सदाशिव पेठ, नागनाथ पाराजवळ, पुणे ३०. ✆ २४४७३४५९.E-mail : rajhans1@pn2.vsnl.net.in

◻ ४१ भवानी शंकर रोड, चितळे पथ कॉर्नर, दादर, मुंबई २८. ✆२४२२३९०१.E-mail : rajhans@bol.net.in ◻ गुलमोहर हॉलसमोर, खामला रोड, नागपूर २५. ✆२२९४२६५. ◻ ४ शिवालिक, वी अपार्टमेंट, समाधान कॉलनी, जिल्हा कोर्टाच्या मागे, औरंगाबाद ५. ✆२३३४६०८. ◻ पंकज क्षेमकल्याणी, फ्लॅट क्र. २, लोटस अपार्टमेंटस, साईनाथनगर, वापू वंगल्याजवळ इंदिरानगर, नाशिक ४२२००९. ✆५६१०३२६. ◻ १४७६ वी, मंगळवार पेठ, कोल्हापूर १२. ✆२६२४३०४. ◻ सुरुची वितरण, भगवती मंदिरासमोर, ढवळी, फोंडा ४०३४०१. ✆२३१२३७५. ◻ श्रीकांत उमरीकर, नानल पेठ, परभणी ४३१४०१. ✆२२५५५०. ◻ भूषण वापट, गांधी चौक, अकोला ✆२४४२१३८.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



Maharashtra Sahitya Partrika Quarterly-April-June 2005 Registered with the Registrar of Newspapers for India Under N0, 6398/57

बुक पोस्ट

प्रती

प्रेषक : प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद** टिळक रस्ता, पुणे– ४११ ०३०.



**महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा**

खप आजमितीला साडेसात हजारावर असून
तिचे संचार-क्षेत्र भारतभर पसरलेले आहे.
चेन्नई ते काश्मीर आणि कांडला ते कोलकता इतके ते विस्तृत झालेले आहे.
प्रत्येक राज्यात 'पत्रिका' जातेच जाते.
जाहिरातदारांनी आवर्जून लक्षात घ्यावी अशी
ही बाब असल्याने तिची नोंद केली आहे.

**जाहिरातीचे दर**

| | |
|---|---|
| आतील पूर्ण पान | रु. २०००/- |
| आतील अर्धे पान | रु. ११००/- |
| आतील पाव पान | रु. ६००/- |
| वेष्टन पृष्ठ क्र. २ व ३ (दोन रंग) प्रत्येकी | रु. ४०००/- |
| वेष्टन पृष्ठ क्र. ४ अर्धे पान (दोन रंग) | रु. ५०००/- |

**तांत्रिक माहिती**

पानाचा आकार
१९ x १३ सें. मी. (डेमी)
छापील पानाचा आकार
१६ x १० सें. मी.
कॉलम : दोन
छपाई : ऑफसेट पद्धतीने
जाहिरातीचा मजकूर किंवा
आर्टपूल रंगीत जाहिरातीसाठी
पॉझिटिव्ह

अनुक्रमणिका




